

# कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय

# रामटेक

## ज्ञानयोगी डॉ. श्रीकांत जिचकार ज्ञानस्त्रोत केंद्र

द्वारा आयोजित

# वाचन संकल्प महाराष्ट्राचा

# अहवाल


प्रो. हरेराम त्रिपाठी
मा.कुलगुरू
प्रेरणा

प्रकाशक
डॉ. देवानंद शुक्ल
कुलसचिव

संपादक
डॉ. दिपक कापडे

संपादक मंडळ
डॉ. प्रगती ढेपे
कु. मीनाक्षी मेश्राम
श्री. मुकेश सहारे
श्री.पुरूषोत्तम कावळे



# कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक

## उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि. 20.12.2024 नुसार

## कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयात

## वाचन संकल्प महाराष्ट्राचा पंधरवडा साजरा

### दि. 30 डिसेंबर 2024 ते 26 जानेवारी 2025

## अहवाल

उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि. 20.12.2024 नुसार सर्व महाविद्यालय/शाळेत **"वाचन संकल्प महाराष्ट्राचा"** हा पंधरवडा साजरा करण्याबाबत आदेश प्राप्त झालेले आहेत. त्यानुसार विश्वविद्यालयाच्या रामटेक येथे **वाचन संकल्प महाराष्ट्राचा** या उपक्रमांतर्गत दि. **30** डिसेंबर 2024 ते 26 जानेवारी 2025 पर्यंत विविध स्पर्धा आयोजित करण्यात आल्या होत्या.

- **ग्रंथ प्रदर्शनी – दि. 30.12.2024**

ग्रंथ प्रदर्शनीचे आयोजन करण्यात आले होते तसेच सदर ग्रंथ प्रदर्शनीचे उद्घाटन विद्यापीठाचे मा. कुलगुरू शुभ यांच्या हस्ते करण्यात आले. या ग्रंथ प्रदर्शनीत विविध विषयाचे ग्रंथ ठेवण्यात आलेले होते तसेच 100 पेक्षा जास्त विद्यार्थ्यांनी या ग्रंथ प्रदर्शनीचा लाभ घेतला.




- **दि. 31.12.2024 –हस्तलिखित प्रदर्शनी**



हस्तलिखित प्रदर्शनीचे आयोजन करण्यात आले तसेच सदर हस्तलिखित प्रदर्शनीत विविध विषयाचे ग्रंथ ठेवण्यात आलेले होते तसेच या हस्तलिखित प्रदर्शनीला शाळेतील 150 पेक्षा जास्त विद्यार्थी उपस्थित होते.

- **दि. 01.01.2025 — वाचन कौशल्य कार्यशाळा**




तिस—या दिवशी वाचन कौशल्य कार्यशाळेचे आयोजन करण्यात आलेले होते. सदर कार्यक्रमाला विश्वविद्यालयातील मान्य वर उपस्थित होते. या वाचन कौशल्य कार्यशाळेला 55 विद्यार्थ्यांना भरपूर प्रतिसाद दिला.

- **दि. 02.01.2025लेखक व विद्यार्थी यांच्यामधील वाचन संवाद —**






चौथ्या दिवशी लेखक व विद्यार्थी यांच्यामधील वाचन संवाद कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. सदर कार्यक्रमाला विश्वविद्यालयातील शिक्षण विभागातील मान्यवर उपस्थित होते. या वाचन संवाद कार्यक्रमातंर्गत इतिहासकार व विद्यार्थी संवाद या विषयावर विद्यार्थ्यासोबत चर्चा करण्यात आली. सदर वाचन संवाद कार्यक्रमाला विद्यार्थ्यांनी भरपूर प्रतिसाद दिला.

- **निबंध स्पर्धा — दि. 03.01.2025**

"वाचन संकल्प महाराष्ट्राचा" या कार्यक्रमाच्या पाचव्या दिवशी विद्यार्थ्यांन करिता निबंध स्पर्धेचे आयोजन करण्यात आले होते. निबंधाचा विषय **"वाचन संकृती"** या विषयावर एकुण 30 पेक्षा जास्त विद्यार्थ्यांकडून निबंध मागविण्यात आले. उत्कृष्ट निबंध लिहिणा—या विद्यार्थ्यांना प्रथम,द्वितीय,तृतिय असे 03 पारीतोषीक दि. 26 जाने. 2025 रोजी देण्यात येणार आहेत.

➢ **भाषांतरकार आणि विद्यार्थी यांच्यामधील संवाद – दि. 04.01.2025**



कार्यक्रमाच्या सहाव्या दिवशी ग्रंथ भाषांतरकार आणि विद्यार्थी यांच्यामधील संवाद कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. या कार्यक्रमाला विश्वविद्यालयातील मा. ग्रंथपाल उपस्थित होते. या ग्रंथ भाषांतरकार आणि विद्यार्थी संवाद कार्यक्रमातंर्गत ग्रंथ भाषांतरकार यांच्या सोबत विद्यार्थ्यांनी चर्चा केली सदर ग्रंथ भाषांतरकार आणि विद्यार्थी या कार्यक्रमाला विद्यार्थ्यांनी भरपूर प्रतिसाद दिला.

➢ **12 तास सामुहीक वाचन स्पर्धा – दि. 06.01.2025**



"वाचन संकल्प महाराष्ट्राचा" या कार्यक्रमातंर्गत ज्ञानयोगी डॉ. श्रीकांत जिचकार ज्ञानस्त्रोत क्रेन्द्राच्या वाचनकक्षात सतत 12 तास सामुहीक वाचन स्पर्धेचे आयोजन करण्यात आले होते या कार्यक्रमात 60 पेक्षा जास्त विद्यार्थ्यांनी सहभाग घेतलेला होता.

➢ **ग्रंथांची सार लेखन स्पर्धा – दि. 07.01.2025**

कार्यक्रमाच्या आठव्या दिवशी ज्ञानयोगी डॉ. श्रीकांत जिचकार ज्ञानस्त्रोत क्रेन्द्राच्या वतीने विद्यार्थ्यांकरिता ग्रंथांची सार लेखन स्पर्धेचे आयोजन करण्यात आलेले होते. या स्पर्धेत जास्तीत जास्त विद्यार्थ्यांनी सहभाग घेतलेला होता.



## ➢ ग्रंथ दिंडी – दि. 10.01.2025




उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि. 20. 12.2024 नुसार सर्व महाविद्यालय/शाळेत "वाचन संकल्प महाराष्ट्राचा" हा पंधरवडा साजरा करण्याबाबत आदेश प्राप्त झालेले होते.त्यानुसार विश्वविद्यालयाच्या रामटेक येथे वाचन संकल्प महाराष्ट्राचा या उपक्रमांतर्गत ग्रंथ दिंडी चे आयोजन दि. 10.01.2025 रोजी आयोजित करण्यात आलेले होते. या ग्रंथ दिंडी चे उद्घाटन मा. राज्यमंत्री आशिषजी जैस्वाल व विश्वविद्यालयाचे मा. कुलगुरू प्रा. हरेराम त्रिपाठी यांच्या हस्ते करण्यात आले.

सदर ग्रंथ दिंडीत रामटेक परिसरातील एकुण 15 शाळा व महाविद्यालयातील एकूण 2000 पेक्षा जास्त विद्यार्थी तसेच शिक्षक या ग्रंथ दिंडीत सहभागी झाले. ग्रंथ दिंडी दि. 10.01.2025 रोजी सकाळी 10.00 वा. ककासंवि ,रामटेक येथून निघाली.

## ➢ एका ग्रंथाचे परीक्षण व कथन – दि. 16.01.2025

विद्यापीठातील एकुण (70)...... विद्यार्थ्यांनी एकुण (100)........ ग्रंथांचे परीक्षण केलेले असून या स्पर्धेत सहभाग दर्शविला तसेच त्यांच्या आवडीचे किंवा अभ्यासाचे कुठलेही एक पुस्तक ग्रंथालयातून घेवून विद्यार्थ्यांनी **ग्रंथाचे परीक्षण व कथन** केलेले आहे. **सर्व विद्यार्थ्यांचे ग्रंथ परीक्षण ग्रंथालयात जमा करण्यात आलेले** असून उत्कृष्ट ग्रंथ परीक्षण करणा–या /लिहिणा–या विद्यार्थ्यांना प्रथम, द्वितीय, तृतिय असे 03 पारीतोषीक दि. 26 जाने. 2025 रोजी देण्यात येणार आहेत.



लोकमत

संस्कृत विद्यापीठाद्वारे 'वाचन संकल्प' सोहळा

### ग्रंथदिंडीने दुमदुमली रामटेकनगरी

लोकमत न्यूज नेटवर्क

**रामटेक :** 'वाचन संकल्प महाराष्ट्राचा' अभियानाअंतर्गत कविकुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठात 'वाचन संकल्प' सोहळा साजरा करण्यात आला. त्याअनुषंगाने काढण्यात आलेल्या ग्रंथदिंडीने रामटेकनगरीमध्ये वाचन संस्कृतीचा गजर करण्यात आला.

डॉ. जिचकार ज्ञानस्रोत केंद्र अर्थात ग्रंथालय विभागातर्फे काढण्यात आलेल्या या ग्रंथदिंडीचे उद्घाटन कुलगुरू प्रो. हरेराम त्रिपाठी यांच्या अध्यक्षतेखाली चंद्रशाला येथे करण्यात आले. यावेळी, अर्थराज्यमंत्री आशिष जयस्वाल, कुलसचिव डॉ. देवानंद शुक्ल, ग्रंथपाल डॉ. दीपक कापडे, शिक्षणशास्त्र अधिष्ठाता प्रो. ललिता चंद्रात्रे, वित्त व लेखा अधिकारी प्रो. कविता होले, प्राचीन विज्ञान आणि मानव्यशास्त्र संकायचे अधिष्ठाता प्रो. कृष्णकुमार पांडेय, रामटेक परिसर संचालक प्रो. हरेकृष्ण अगस्ती उपस्थित होते. अर्थराज्यमंत्रिपदाचा कार्यभार स्वीकारल्यानंतर आ. आशिष जयस्वाल यांचा सत्कार करण्यात आला. प्रास्ताविक डॉ. दीपक कापडे यांनी केले. संचालन ग्रंथपाल डॉ. सुमित कठाळे यांनी केले तर आभार रासेयो समन्वयक डॉ. जयवंत चौधरी यांनी मानले. आयोजनासाठी गटविकास अधिकारी जयसिंग जाधव, गटशिक्षणाधिकारी विजय भाकरे यांनी सहकार्य केले.

ग्रंथदिंडीत सहभागी विद्यार्थी आणि मान्यवर.

Hello Nagpur Gramin
Page No. 7 Jan 11, 2025
Powered by: erelego.com



नवराष्ट्र
www.navarashtra.com

आयोजन • 'वाचन संकल्प महाराष्ट्राचा उपक्रम : राज्यमंत्री जयस्वाल यांच्या हस्ते ग्रंथदिंडीचे पूजन

### संस्कृत विद्यापीठाच्या ग्रंथदिंडीने वेधले लक्ष

शैक्षणिक

रामटेक, तालुका प्रतिनिधी. शासनाच्या उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या माध्यमातून वाचन संस्कृतीला चालना देण्यासाठी नववर्षाच्या मुहूर्तावर 'वाचन संकल्प महाराष्ट्राचा' हा व्यापक उपक्रम राबविण्यात येत आहे. या अभियानात रामटेकचे कविकुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठही विविध वाचन केन्द्री वाचन प्रोत्साहक, वाचक व लेखक अनुबंध जोपासणारे विविध कार्यक्रमांच्या आयोजनाने सहभागी झाले आहे. या कार्यक्रमांतर्गत डॉ जिचकार ज्ञानस्रोत केंद्र अर्थात ग्रंथालय विभागातर्फे शुक्रवारी (दि.10) सकाळी 10 वाजता संस्कृत विद्यापीठ परिसरात ग्रंथ दिंडीचे आयोजन करण्यात आले.
ग्रंथ दिंडीचे उद्घाटन कुलगुरू प्रा. हरेराम त्रिपाठी यांच्या अध्यक्षतेखाली चंद्रशाला येथे पार पडले. याप्रसंगी प्रमुख अतिथी अर्थ राज्यमंत्री आशिष जयस्वाल यांच्यासह कुलसचिव डॉ. देवानंद शुक्ल, आयोजक ग्रंथपाल डॉ. दीपक कापडे, शिक्षण शास्त्र अधिष्ठाता प्रा. ललिता चंद्रात्रे, वित्त व लेखा अधिकारी प्रा. कविता होले, प्राचीन विज्ञान आणि मानव्यशास्त्र संकायाचे अधिष्ठाता प्रा. कृष्णकुमार पांडेय, रामटेक परिसर संचालक प्रा. हरेकृष्ण अगस्ती प्रामुख्याने उपस्थित होते. दरम्यान अर्थ राज्यमंत्री आशिष जयस्वाल यांचा विद्यापीठातर्फे शाल, संस्कृत ज्ञानेश्वरी देवून स्वागत करण्यात आले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक ग्रंथदिंडीचे आयोजक डॉ दीपक कापडे यांनी केले. प्रास्ताविकात शालेय आणि महाविद्यालयातील विद्यार्थ्यांवर वाचनाचे संस्कार व्हावे या उद्देशाने या दिंडीचे आयोजन करण्यात आल्याचे सांगितले. ना. आशिष जयस्वाल यांनी महाराष्ट्र शासनाने सुरु केलेला हा उपक्रम अतिशय महत्त्वाचा असून सोशल मीडिया मुळे वाचनापासून दुरावलेल्या नव्या पिढीला वाचनाकडे आकर्षित करण्यासाठी या उपक्रमाचा लाभ होणार असल्याचे सांगितले. कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाने रामटेक नगरीतील विविध शाळा आणि महाविद्यालयांना संमीलित करून हा उपक्रम राबविला याबद्दल त्यांनी विश्वविद्यालयाचे अभिनंदन केले. विश्वविद्यालयाने दरवर्षी हा उपक्रम राबवावा अशी सूचनाही यावेळी जयस्वाल यांनी केली. विद्यापीठाचा विकास करण्याला विशेष प्राधान्य असून आवश्यक तो निधी उपलब्ध करुन देण्यास मदत करण्याचे आश्वासन त्यांनी दिले, शिवाय विद्यापीठ परिसर रम्य असून तो अधिक पर्यावरणस्नेही करावा, अशा सूचना जयस्वाल यांनी केल्या.

वाचन संस्कृतीचा प्रसार-प्रचारासह विद्यार्थ्यांच्या मनावर वाचनाचे संस्कार व्हावे, यासाठी हा विशेष उपक्रम राबविण्यात आल्याचे कुलगुरू डॉ. त्रिपाठी यांनी सांगितले. गटविकास अधिकारी जयसिंग जाधव, गट शिक्षणाधिकारी विजय भाकरे यांचेसह रामटेक पोलिस यंत्रणा व वैद्यकीय यंत्रणेने ही ग्रंथदिंडी यशस्वी करण्यासाठी सर्वतोपरी सहकार्य केले. अर्थ राज्यमंत्री आशिष जयस्वाल यांच्या हस्ते मराठी साहित्याचे लेणे असलेल्या ज्ञानेश्वरीसह विविध ग्रंथाच्या पूजन करण्यात आले. तद्नंतर कार्यक्रमाचे संचालक डॉ. सुमित कठाळे यांनी 'छत्रपती शिवाजी महाराज की जय' अशा ललकारीने ग्रंथ दिंडीला सुरुवात झाली. ढोलताशाच्या गजरात, पारंपरिक वेशात, लेझिमच्या तालावर, एकतारीच्या सुरात अत्यंत उत्साहात ग्रंथ दिंडी पुढे-पुढे चालत होती. प्रत्येकाने ग्रंथदिंडी स्वतःच्या खांद्यावर घेवून ग्रंथ सन्मान केला, तसेच वाचक म्हणून आपली प्रतिबद्धता दाखवून दिली. या ग्रंथ दिंडीत रामटेक व आसपासच्या शाळा व महाविद्यालयातील 2000 विद्यार्थी व प्राध्यापक सहभागी झाले होते. ही ग्रंथदिंडी विद्यापीठाचे मुख्यालय ते रामटेक बसस्थानकादरम्यान काढण्यात आली. वाचन आणि मराठी भाषा विषयक विविध घोषणांनी भक्तिगीत गायनाने आसमंत दुमदुमला होता. रामटेक शहरवासीयांनी या दिंडीचे कौतुक तसेच उत्साहाने स्वागत केले. कुलगुरू प्रा. हरेराम त्रिपाठी आणि कुलसचिव डॉ देवानंद शुक्ल यांच्या प्रेरणेने तसेच प्रा. कलापिनी अगस्ती यांच्या मार्गदर्शनाखाली ग्रंथपाल डॉ. दीपक कापडे यांच्या नेतृत्वात आणि विद्यापीठातील सर्वांच्या सहभागाने ही वाचन दिंडी यशस्वी झाली. संचालन डॉ.सुमित कठाळे यांनी केले, तर आभार रासेयो समन्वयक डॉ.जयवंत चौधरी यांनी मानले.

Orange City Metro Edition
Jan 11, 2025 Page No. 2
Powered by: Navarashtra.com

नवराष्ट्र
www.navarashtra.com

**आयोजन** • 'वाचन संकल्प महाराष्ट्राचा उपक्रम : राज्यमंत्री जयस्वाल यांच्या हस्ते ग्रंथदिंडीचे पूजन

# संस्कृत विद्यापीठाच्या ग्रंथदिंडीने वेधले लक्ष

**शैक्षणिक**

**रामटेक,** तालुका प्रतिनिधी. शासनाच्या उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या माध्यमातून वाचन संस्कृतीला चालना देण्यासाठी नववर्षाच्या मुहूर्तावर 'वाचन संकल्प महाराष्ट्राचा' हा व्यापक उपक्रम राबविण्यात येत आहे. या अभियानात रामटेकचे कविकुलगुरू कालिदास संस्कृत विद्यापीठही विविध वाचन केन्द्री वाचन प्रोत्साहक, वाचक व लेखक अनुबंध जोपासणारे विविध कार्यक्रमांच्या आयोजनाने सहभागी झाले आहे. या कार्यक्रमांतर्गत डॉ जिचकार ज्ञानस्रोत केंद्र अर्थात ग्रंथालय विभागातर्फे शुक्रवारी (दि.10) सकाळी 10 वाजता संस्कृत विद्यापीठ परिसरात ग्रंथ दिंडीचे आयोजन करण्यात आले.

ग्रंथ दिंडीचे उद्घाटन कुलगुरू प्रा. हरेराम त्रिपाठी यांच्या अध्यक्षतेखाली चंद्रशाला येथे पार पडले. याप्रसंगी प्रमुख अतिथी अर्थ राज्यमंत्री आशिष जयस्वाल यांच्यासह कुलसचिव डॉ. देवानंद शुक्ल, आयोजक ग्रंथपाल डॉ. दीपक कापडे, शिक्षण शास्त्र अधिष्ठाता प्रा. ललिता चंद्रात्रे, वित्त व लेखा अधिकारी प्रा. कविता होले, प्राचीन विज्ञान आणि मानव्यशास्त्र संकायाचे अधिष्ठाता प्रा. कृष्णकुमार पांडेय, रामटेक परिसर संचालक प्रा. हरेकृष्ण अगस्ती प्रामुख्याने उपस्थित



होते. दरम्यान अर्थ राज्यमंत्री आशिष जयस्वाल यांचा विद्यापीठातर्फे शाल, संस्कृत ज्ञानेश्वरी देवून स्वागत करण्यात आले. कार्यक्रमाचे प्रास्ताविक ग्रंथदिंडीचे आयोजक डॉ दीपक कापडे यांनी केले. प्रास्ताविकात शालेय आणि महाविद्यालयातील विद्यार्थ्यांवर वाचनाचे संस्कार व्हावे या उद्देशाने या दिंडीचे आयोजन करण्यात आल्याचे सांगितले. ना. आशिष जयस्वाल यांनी महाराष्ट्र शासनाने सुरु केलेला हा उपक्रम अतिशय महत्त्वाचा असून सोशल मीडिया मुळे वाचनापासून दुरावलेल्या नव्या पिढीला वाचनाकडे आकर्षित करण्यासाठी या उपक्रमाचा लाभ होणार असल्याचे सांगितले. कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाने रामटेक नगरीतील विविध शाळा आणि महाविद्यालयांना संमीलित करून हा उपक्रम राबविला याबद्दल त्यांनी विश्वविद्यालयाचे अभिनंदन केले. विश्वविद्यालयाने दरवर्षी हा उपक्रम राबवावा अशी सूचनाही यावेळी जयस्वाल यांनी केली. विद्यापीठाचा विकास करण्याला विशेष प्राधान्य असून आवश्यक तो निधी उपलब्ध करुन देण्यास मदत करण्याचे आश्वासन त्यांनी दिले, शिवाय विद्यापीठ परिसर रम्य असून तो अधिक पर्यावरणस्नेही करावा, अशा सूचना जयस्वाल यांनी केल्या.

वाचन संस्कृतीचा प्रसार-प्रचारासह विद्यार्थ्यांच्या मनावर वाचनाचे संस्कार व्हावे, यासाठी हा विशेष उपक्रम राबविण्यात आल्याचे कुलगुरू डॉ. त्रिपाठी यांनी सांगितले. गटविकास अधिकारी जयसिंग जाधव, गट शिक्षणाधिकारी विजय भाकरे यांचेसह रामटेक पोलिस यंत्रणा व वैद्यकीय यंत्रणेने ही ग्रंथदिंडी यशस्वी करण्यासाठी सर्वतोपरी सहकार्य केले. अर्थ राज्यमंत्री आशिष जयस्वाल यांच्या हस्ते मराठी साहित्याचे लेणे असलेल्या ज्ञानेश्वरीसह विविध ग्रंथाच्या पूजन करण्यात आले. तद्नंतर कार्यक्रमाचे संचालक डॉ. सुमित कठाळे यांनी 'छत्रपती शिवाजी महाराज की जय' अशा ललकारीने ग्रंथ दिंडीला सुरुवात झाली. ढोलताशाच्या गजरात, पारंपरिक वेशात, लेझिमच्या तालावर, एकतारीच्या सुरात अत्यंत उत्साहात ग्रंथ दिंडी पुढे-पुढे चालत होती. प्रत्येकाने ग्रंथदिंडी स्वतःच्या खांद्यावर घेवून ग्रंथ सन्मान केला, तसेच वाचक म्हणून आपली प्रतिबद्धता दाखवून दिली. या ग्रंथ दिंडीत रामटेक व आसपासच्या शाळा व महाविद्यालयातील 2000 विद्यार्थी व प्राध्यापक सहभागी झाले होते. ही ग्रंथदिंडी विद्यापीठाचे मुख्यालय ते रामटेक बसस्थानकादरम्यान काढण्यात आली. वाचन आणि मराठी भाषा विषयक विविध घोषणांनी भक्तिगीत गायनाने आसमंत दुमदुमला होता. रामटेक शहरवासीयांनी या दिंडीचे कौतुक तसेच उत्साहाने स्वागत केले. कुलगुरू प्रा. हरेराम त्रिपाठी आणि कुलसचिव डॉ देवानंद शुक्ल यांच्या प्रेरणेने तसेच प्रा. कलापिनी अगस्ती यांच्या मार्गदर्शनाखाली ग्रंथपाल डॉ. दीपक कापडे यांच्या नेतृत्वात आणि विद्यापीठातील सर्वांच्या सहभागाने ही वाचन दिंडी यशस्वी झाली. संचालन डॉ.सुमित कठाळे यांनी केले, तर आभार रासेयो समन्वयक डॉ.जयवंत चौधरी यांनी मानले.

Orange City Metro Edition
Jan 11, 2025 Page No. 2
Powered by: Navarashtra.com

ग्रंथपाल

ककासंवि.,रामटेक

निबंध स्पर्धा

Name - Bhagyashri S. Selokar

class - B.A Sanskrut 2 year

Sub. - Vachan Sanskruti

——— X ———

Date
Page

## वाचन संस्कृति



हमारी पुरानी वाचन (शिक्षा) संस्कृति लिखित नही थी पहले ऋषिमुनि हुआ करते थे जो पेड़ो के निचे पढ़ाया करते थे उस समय सुन कर शिक्षा ग्रहण कि जाती थी लिखा नही होता था धीरे - धीरे यह विकसित हुई और फिर हस्त लिपि कि शुरुवात हुई। अब शिक्षा व्यवस्था में भी पढने का महत्व अद्वितीय है। विद्यार्थी शिक्षक - प्रधानाचार्य द्वारा निरंतर पढ़े बिना ज्ञान प्राप्त नहीं किया जाता है हॉलाकि यह सब सच है हाल ही मे पढने में रुचि कम हो रही है... लेकिन सिर्फ शिकायते करने से कुछ नहीं होगा हमे इसका समाधान निकालना होगा। क्योंकि पढ़ेगे तो ही आगे बढ़ेगे।

यदि छात्रो से अपेक्षा की जाती है कि वह पढ़े, तो शिक्षको को उन्हे यह दिखाना चाहिए कि परियोजनाओ के माध्यम से वास्तविक कार्य के माध्यम से पढने के शौक को कैसे विकसित किया जाए। पाठ्यपुस्तके तो बच्चे संभाल लेते हैं, लेकिन माध्यमिक पुस्तकें रुचेत होकर पढ़नी चाहिए। बच्चों मे पढने-लिखने के प्रति रुचि पैदा करने के लिए स्कूल को कक्षा से ही 'बुक बॉक्स' जैसी गतिविधियों करनी चाहिए। 'बुक बॉक्स' मे बच्चो की पत्रिकाएँ, किताबें, पेड़ - पौधों की जानकारी की कतरनें, कार्टून वाहन - लैपटॉप - मोबाइल रखना चाहिए।

Date..........
Page..........

छात्रों को उनके जन्मदिन पर चॉकलेट देने के अलावा, उपहार के रूप में एक किताब उपहार के रूप मे देनी चाहिए। हर व्यक्ति को हमेशा कोई ना कोई पुस्तक अध्ययन करते रहनी चाहिए क्योंकि वाचन कि कोई उम्र नही होती है। हर घर मे एक अध्ययन कक्ष होना चाहिए चाहे भी छोटा सा क्यो ना हो क्योकि अध्य करने से ही सब कुछ होगा।

स्कूल की लाइब्रेरी का समृद्ध होना एक आभूषण है जिसे स्कूल गर्व से प्रदर्शित कर सक है। पुस्तकालय में विभिन्न विषयों पर पुस्तके, पत्रिकाऐ आदि। आज के समय मे सारी किताबे ई-बुक्स, ई-जर्नल्स यू-ट्यूब, गूगल, विकिपीडिया पर मिल जायेगी। लेकिन किताबो से पढने मे जो मजा है वो और किसी मे नही। फिर भी आज के समय मे जो भी चल रहा है तो उससे भी अच्छी शिक्षा प्राप्त की जा सकती है। इसक सही उपयोग करना चाहिए।

हाल ही में टी.वी. संस्कृति (चौबीस घंटे वही समाचार, वर्षों तक वही धारावाहिक) के कारण 'पढने' की संस्कृति पर प्रतिकूल प्रभाव पड़ा है। यदि टी. सीमित है तो असीमित पढना संभव होगा। ख्यात शिक्षा संस्थान के अध्यक्ष रावसाहेब शिंदे हमेशा अपने व्याख्याओ के माध्यम से शिक्षको को पढने के लिए प्रोत्साहित करते है सोसल मिडिया मे बच्चो पर बहुत बुरा प्रभाव डाला है। हम इसे कम करने का प्रयास करना आवश्यक है। नही तो बहुत सी समस्याओ का सामना करना पड सकता है।

बच्चे कहानियाँ, कविताएँ, गीत स्वयं लिख सकते हैं, वास्तव में, उन्हें किसी अच्छे लेखक के लिए प्रशिक्षित किया जा सकता है। बच्चों की कल्पनाओं को कागज पर उतारकर रचनात्मकता को निखारा जा सकता है। बच्चों ने कक्षा में जो लिखा है उसे पढ़कर कुछ सुधार भी सुझाए जा सकते है। और यह किसी भी भाषा मे लिखने कि अनुमति होनी चाहिए।

डा॰ A.P.J. अब्दुल कलाम, कम से आदर्श रचने वाले नारायणमूर्ति जैसे व्यक्तित्व के पहलुओ महात्मा गांधी, रवीन्द्रनाथ टैगोर, विनोबा भावे जैसे राष्ट्रीय महानों की जीवनीयाँ, उनके साहित्य को पढ़कर प्रेरित और सोचा जा सकता है। अन्य भाषाओ के अनुवाद भी बहुत ~~पठनीय~~ पठनीय हैं। क्या अंग्रेजी शिक्षक अंग्रेजी अखबार पढ़ते है? मैं अक्सर थरथराहट को यह पूछे जाने पर कि 'शिक्षक' चयन साक्षात्कार मे अपने क्या पढ़ा' जवाब देकर बच निकलते देखा है इस समय यह प्रश्न उठता है कि क्या अपने हाथों मे एक पीढ़ी का निर्माण करना आना चाहिए।

वाचन (अध्ययन) करने से ही व्यक्ति एक अच्छा मनुष्य बनाता है उसे अच्छे-बुरे की समझ होती है वह समाज मे एक प्रतिष्ठावान व्यक्ति बनता है वह देश का नाम रोशन करता है। शिक्षा से व्यक्ति के लिए सब कुछ होती है। शिक्षा से ही I A S. बनता है शिक्षा से ही शिक्षक बनता है शिक्षा से ही डॉ॰ बनता है सब कुछ शिक्षा से ही होता है। क्योकि पढ़ोगे तब ही तो बढ़ोगे।

Date ........
Page ........

वाचन (शिक्षा) की जीवन के प्रत्येक क्षेत्र मे आवश्यकता होती है। वाचन की योग्यता न रखने से व्यक्ति संसार की सांस्कृति महानता मे अपने अस्तिव का आनन्द नहीं ले पाता है। वाचन योग्यता के बिना मनुष्य के जीवन मे कई प्रकार की बाधाएँ खडी हो जाती है। वाचन शिक्षा प्राप्ति मे सहायकता है।

वाचन संस्कृति महत्वपूर्ण है, वाचन मनुष्य को कौशल से सभी क्षेत्रों का ज्ञान प्राप्त होता है। वाचन (शिक्षा) एक ऐसी ऊर्जा है जो मनुष्य को अधिक बुध्दिमान बनाती है। शिक्षा से ही मनुष्य का जीवन सुंदर महान बन सकता है। निरन्तर अध्ययन करने से बुध्दि का विकाश होता है। लोगो से बात करने का ज्ञान होता है। तर्क शक्ति बढती है। वाचन यानी पढना एक बहुत अच्छी आदत होती है, जिसका जीवन मे बहुत महत्व होता है। वाचन करने से हमे बहुत सी जानकारीयाँ प्राप्त होती है। तनाव दूर होता है। वाचन करना समय के सदुपयोग का सबसे बेहतरीन उपाय है।

निबंध

Page No. Date / /20

नाव :- धनश्री मुनेंद्र शरणागत

कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय रामटेक

वर्ग :- B.A sanskrut 3rd year

विषय :- वाचन संस्कृती

ATLAS

# वाचन संस्कृती

"वाचनातून घडते विचार मंथन,
वाचनातूनच फुलते संस्कृती आणि जीवन!"

अन्न, वस्त्र, निवारा, या माणसाच्या मूलभूत गरजा आहेत. तसेच 'वाचन' ही प्रत्येक संवेदनशील, आर्त मनाची 'आस' आहे.

जीवन खऱ्या अर्थाने सुंदर, आशयसंपन्न होते. ते पुस्तक वाचनातूनच! आपला वेळ सत्कारणी लागतो, मनोरंजन तर होतेच पण ज्ञानप्राप्ती साठी होते. वर्तमानपत्रे, मासिके, कथा, कादंबऱ्या कविता, मानवी मनाचा वेध घेतात. वाचनातून शब्दसंपत्ती वाढते, बुद्धीला चालना मिळते. आणि स्मरणशक्ती वाढते.

India books आजच्या मनुष्याच्या ठिकाणी असणारे ज्ञान ही त्याची फार मोठी शक्ती आहे. या शक्तीच्या सहाय्याने तो सुबुद्ध आणि प्रगल्भ तर होतोच; परंतु त्याच्या कार्य संस्कृतीवर सुद्धा त्याचा प्रभाव पडतो. मागल्या पिढीपेक्षा आताच्या पिढीचे वाचन अगदी अल्प झाले आहे. अशी तक्रार सर्वच थरातून वाढते आहे.

वाचन संस्कृती टिकवून धरण्यासाठी आणि प्रत्येक माणसाचे मन सुविचार संपन्न होण्यासाठी वाचनाची आवड मुळापासूनच निर्माण होणे आवश्यक आहे.

तरुणांमध्ये वाचन वेड उत्पन्न व्हायचे असेल तर तशी परिस्थिती त्यांच्या भवती निर्माण होणं गरजेचं आहे. वाचनानेच माणूस मोठा होत असतो. पुस्तकांचे वाचन कराल तेवढेच ज्ञान वाढत वाढत जाईल. ग्रंथ हे गुरु आहेत. अलिकडच्या काळात आपल्या मोबाइल फोनवरसुद्धा विशिष्ट नंबर फिरविल्याबरोबर आजच्या घडीला जगातील कानाकोपऱ्यात घडणाऱ्या घटकांची अद्ययावत माहिती प्राप्त होते.

वैचारिक लेख वाचताना आपण अंतर्मुख होतो. आपण, चांगले काय? वाईट काय? याचा विचार करतो. त्यामुळेच आपली विवेक बुद्धी, निरीक्षणशक्ती आणि संवेदनशीलता वाढते. चांगली प्रेरणादायक पुस्तके समाजात 'दीपस्तंभाचे' कार्य करतात. समाजात क्रांती घडवतात, समाजाला सुयोग्य दिशा दाखवतात, समाजमनात आशावाद निर्माण करतात. डॉ. ए. पी. जे. कलाम यांचे 'अग्निपंख' हे पुस्तक आपल्याला संघर्ष नि अपयशाचा सामना करत, सतत

Page No. Date / /20

प्रयत्नशील कसे रहावे हे शिकवतात एक होता कार्व्हर, श्रीमान योगी, मृत्युंजय, छावा, व्यक्ती आणि वल्ली अशी अनेक पुस्तके आपल्या मनाची मशागत करतात. नकारात्मकता, ताण तसेच नैराश्य याचा निचरा होतो. मनात सकारात्मक वृत्ती विकसित होते. मनात भावभावनांचे तरंग उमटतात, विचारांची आंदोलन घडतात. परंतु, चांगले साहित्य निवडणे आपल्या हातात आहे.

चांगल्या साहित्याचे, चांगल्या विचारांचे वाचन व त्यांचा प्रचार, प्रसार करणे सुशिक्षित, सुसंस्कृत समाजाचे उत्तम लक्षण आहे. चांगल्या पुस्तकांच्या वाचनातून नीतिमूल्यांची जसे आदर, कृतज्ञता, सहकार्य यांची रुजोपासना होते. म्हणूनच लहान मुलांचे मन जेव्हा कोवळे, संवेदनशील, निरागस असते त्याचवेळी पालक व शिक्षकांनी पुस्तक वाचनाची गोडी विकसित करणे आवश्यक आहे. आजही असंख्य मुले, 'श्यामची आई' इसापनीती, फास्टर फेणे, चिंटू आवर्जून वाचतात. कारण वाचन संस्कार ही काळाची गरज आहे.

आजच्या तंत्रज्ञानाच्या, वेगवान युगातही फेसबुक, व्हॉटसअॅप, यू-ट्युब, माध्यमातून

ATLAS

Page No. Date / /20

वैचारिक लेख, कथा, कवितांचे आदानप्रदान होते. ई बुक्स, ई-जर्नल्स, पी.डी.एफ. या नव्या स्वरूपातही वाचन चळवळ सुरु आहे. आणि पुढेही सुरुच राहील. आपण डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम, यांचा जन्मदिवस 'वाचन प्रेरणा दिन' म्हणून उत्साहाने, आनंदाने साजरा करतो.

या दिवशी शाळा, महाविद्यालयात निबंध लेखन स्पर्धा, पाठांतर स्पर्धा होतात. वक्तृत्व आणि काव्य स्पर्धा होते. वाचन संस्कृतीला, वाचन चळवळीला प्रेरणा मिळते.

मुलांना ग्रंथप्रदर्शन, वाचनालय, अभिवाचन, कथाकथन कार्यक्रम, नाट्य शिबिरे यांची ओळख व आवड निर्माण करणे हे पालक, शिक्षकांची जबाबदारी आहे. कारण वाचन संस्कारातूनच मुले व्यसने, घातक, संगणक खेळ, वाईट संगत यातून स्वत: बाहेर पडतील. त्यांच्या व्यक्तिमत्त्व विकास होईल आणि भारताचे भावी सुजाण, सुसंस्कृत नागरिक म्हणून हीच मुले मातृभूमीला बलशाली, प्रगतीशील करु शकतील कारण वाचन संस्कारातूनच 'वाचाल तर वाचाल!' असे का म्हणतात? हे ते स्वत: आत्मसात करतील. आणि,

ATLAS

"वाचे बरवे कवित्व ।
कवित्वी रसिकत्व ।
स्पर्श जैसा ।"

असे ज्ञानेश्वर ~~म~~

रसिकत्वी परतत्व ।
स्पर्श जैसा ।

असे ज्ञानेश्वर माऊलींनी म्हटलेच आहे.



निबंध

Page No. Date / /20

नाम → खुशबू वाढई

कक्षा → BBA द्वितिय वर्ष

विषय → " वाचन संस्कृति "

" निबंध "

कविकुलगुरु कालिदास

संस्कृत विश्वविद्यालय - रामटेक

9699383450

# वाचन संस्कृती

परिचय ⇒

वाचन संस्कृति म्हणजे ज्ञानाच्या साहित्य वाचनाची पुस्तके लेख वृत्तपत्रे आणि ही संस्कृती समाजाच्या बौद्धिक सांस्कृतिक आणि नैतिक प्रगतीसाठी अत्यंत महत्वपूर्ण आहे. वाचन केवळ ज्ञानप्राप्तीचे साधन नसून. ते वैचारिक भावनिक आणि आत्मीक विकासासाठीही उपयुक्त आहे. बदलत्या काळात वाचन संस्कृती कमी होत चालली दिसून येते याचा विचार करणे फार गरजेचे आहे पुस्तकामधून आपल्याला नवनवीन विचार माहिती आणि ज्ञान मिळते. वाचन हे केवळ करमणुकीचे साधन नाही, तर मनुष्याच्या बौद्धिक आणि मानसिक प्रगतीचे एक महत्वपूर्ण साधन आहे.

वाचनसंस्कृती म्हणजे काय? ⇒

वाचन मनन चिंतन ही माणसाच्या उत्कर्षाची साधनं आहेत वाचन म्हणजे फक्त अक्षरवाचनच नव्हे वाचनाची संस्कृती एकदा आपलीशी केली कि समाज देखील वाचता आला पाहिजे जगाच्या तुलनेत आपण कसे कुठे आहोत हेही वाचता आलं पाहिजे. वाचन करणं म्हणजे विचार करण्याची सवय लावणं. त्यामुळे अर्थातच आपलं जगणंही समृद्ध होत जातं.

वाचन संस्कृतीला हजारो वर्षांचा इतिहास आहे सो सार्वभौमिक सार्वकालिक होती आणि असणारा आहे. याचं कारण माणसाचं जगणं आणि

पुर्वीच्या काळी सामाजिक व धार्मिक
प्राशंन्यामुळे आणि आजच्या काळात आधुनिकतावादाच्या
रेट्यामुळे आपले वाचन अजूनही मर्यादितच आहे.
माहिती तंत्रज्ञान सध्याच्या आपल्याला केवळ घेतच
हे खरं आहे पण म्हणून वाचण्याकडे दुर्लक्ष करून
चालणारा नाही. हा लिखाणपर्यंत आणि वाचनाकडे
बघण्याचा दृष्टीकोन बदलण्यात केलेला आहे.

वाचनातुन मानवी जीवनातील मुल्ये संस्कृती
परंपरा आणि भावनिक गोष्टींची जाणीव होते.
वाचनामुळे भाषेची जाण वाढते आणि विचार
शक्तीला चालना मिळते विविध विषयांवर माहिती
मिळाल्याने व्यक्तीची अभिव्यक्ती अधिक प्रभावी
बनते. ग्रंथवाचन हे केवळ माहिती मिळवण्या
साठीच नसते, तर ते मनोरंजनाचेही साधन
आहे चांगल्या पुस्तकांचे वाचन मन:शांती
देते आणि जीवनातील ताण-तणाव कमी
करते वाचनाच्या माध्यमातुन आपण विविध
विषयांची माहिती मिळवतो. विज्ञान इतिहास
तत्वज्ञान. साहित्य अशा अनेक क्षेत्रात ज्ञानसंपदा
वाचनामुळे संपन्न होते.

वाचणे हा अतिशय उत्तम छंद आहे वाचन
वेगवेगळ्या भाषात करू शकतो. वाचन केल्याने आपले
स्मरणशक्ती वाढत असते. वाचनाने माणसाच्या
जीवनाला नवीन दिशा मिळते आपल्याला विचार
करायला शिकवते.

वाचन संस्कृती आणि समाजाची प्रगती -

वाचन संस्कृती ही समाजाच्या प्रगतीचा एक आरसा आहे. वाचनाने व्यक्तीला केवळ वैयक्तिक स्तरावरच नव्हे तर सामाजिक आणि राष्ट्रीय स्तरावरही प्रगती करण्यास मदत होते. एक वाचनप्रिय आणि सृजनशील असतो.

ज्ञानावरील प्रकार -

श्रवण वाचन
लेखन भाषण

वाचन विचार आणि आकलनाच्या प्रक्रियेत लेखनाचे पण महत्त्वाचे योगदान आहे. वाचना प्रमाणे लेखनाला पण तितकेच महत्व आहे.

वाचन संस्कृतीची सद्यस्थिती -

काही मागील दशकाच्या काळापासून वाचन संस्कृतीवर तंत्रज्ञानाचा मोठा प्रभाव पडला दिसतो. आधी लोक पुस्तक वाचण्यात वेळ घालवत असत. आजच्या समाजात मोबाईल, टीव्ही, सोशल मीडिया यांनी जागा घेतली. वाचनाची जागा व्हिडीओ रील, लघु व्हिडीओ आणि वेगवेगळ्या डिजिटल प्लॅटफॉर्मसने घेतली म्हणून पिढी वाचनापासून दूर होत आहे. शाळांमधील अभ्यास क्रमामध्येही वाचन संस्कृतीला पुरेसा प्रोत्साहन मिळत नाही. धावपळीचे बदलत जीवनशैलीमुळे लोकांच्या वेळेचे नियोजन बदलेले आहे, त्यामुळे वाचनासाठी वेळ मिळत नाही.

त्याच्या पृथ्वीवर असण्याविषयीचं कुतूहल हेच होय पुस्तक हातात येण्यापूर्वीही माणूस वाचत होताच की झाडाच्या ढोलीमधून बाहेर आल्यावर निसर्गाचा सारा दिवाणखाना त्यासाठी उघडलेला होता या सगळ्याशी आपलं नातं काय या प्रश्नाने तो अस्वस्थ होत गेला जगण्याच्या आधिव्याधीतून समोरच्या आपल्यासारख्याच दिसणाऱ्या दुसऱ्या माणसाशी वागताना. त्याला समजून घेताना. त्याच्याशी लढण्यापासून ते थेट त्याच्या मदतीला धावून जाण्यापर्यंतचा ते पर त्याच्या डोळ्यासमोरच होता भावनांलना भावनांसची प्राणिसृष्टी आणि माणसं यांचं आकलन होता होता तो भराभर परिस्थिती वाचू लागला. त्याला अन्वयार्थ लावू लागला आणि गुहाचित्रांमधून व्यक्त होऊ लागला। गुहाचित्रांचा काळ साधारण तीस हजार वर्षांपूर्वीचा आहे चित्रांमधून व्यक्त होता होता वाचनसंस्कृतीचा प्रारंभ झाला.

भारतीय समाज पूर्वीपासूनच विविध स्तरीय आणि वर्णभेदाने ग्रस्त असलेला आपल्याला पहायला मिळतो. ज्ञानाच्या क्षेत्राशी हजारो वर्षांपासून बहुजनांच्या संबंध तोडण्यात आला होता, अशा परिस्थितीत ज्ञान ग्रहण करण्याचा, देण्याचा, शिकण्याचा शिकवण्याचा अधिकार विशिष्ट वर्गापुरता मर्यादित राहिला. आज जेव्हा आपण वाचन संस्कृती विषयी चर्चा करतो तेव्हा भारताच्या सामाजिक आणि सांस्कृतिक इतिहासावर नजर टाकणे क्रमप्राप्त ठरते. वाचनाचा विकास करताना प्रथम आपण वाचनाकडे वळणं हे अधिक महत्त्वाचं आहे.

me Of Practical

आज जेव्हा आपण वाचन संस्कृती विषयी चर्चा करतो तेव्हा भारताच्या सामाजिक आणि सांस्कृतिक इतिहासावर नजर टाकणे क्रमप्राप्त ठरते. वाचनाच्या विकास करताना प्रथम आपण वाचनाकडे वळणं हे अधिक महत्वाचं आहे. पूर्वीच्या काळी सामाजिक व धार्मिक पारतंत्र्यामुळे आणि आजच्या काळात आधुनिकतावादाच्या रेट्यामुळे आपले वाचन अजूनही मर्यादित आहे.

वाचन विचार आणि आकलनाच्या प्रक्रियेत लेखनाचे पण महत्वाचे योगदान आहे. वाचना प्रमाणे लेखनाला पण तितकच महत्व आहे. लोकांना प्रेरणा देण्यासाठी दिले जाणार भाषणांसाठी आपल्याला अगोदर त्या गोष्टीचा वाचन. हे आपल्याला फार गरजेचे आहे. वाचनापासून शब्दात आणि व्याकरणामध्ये आपल्याला सुधारणा येते त्यापासुन आपल्याला लिहण्याची भाषण करण्याची व बोलण्याची क्षमता वाढत असते वाचनाने आपल्या कल्पनाशक्ती, सूक्ष्म बुद्धी आणि रचनात्मकता गोष्टींचा विकास होतो.

वाचनाने आपलं साहित्य आणि इतिहास यातील गोष्टींची जाणीव होत असते. संस्कृती परंपरा आणि या समाजाला योग्य रुपा प्रमाणे आपण समजु शकतो.

PAGE NO.: निबंध

DATE

नाव :- खुशी बापुरावजी घरजाळे

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय रामटेक

वर्ग :- बी.ए तृतीय वर्ष (संस्कृत साहित्य)

विषय :- 'वाचन संस्कृती'




Teacher's Signature .......

PAGE NO.:
DATE

ज्ञानाच्या चार पायऱ्या....

व्यक्तिमत्व विकास हा आज परवलीचा शब्द झाला आहे व्यक्तिमत्वात व्यक्तीचे बाह्यदर्शन आणि त्याच्या आंतरिक क्षमता यांना महत्त्व असते. आंतरिक क्षमतांच्या जडणघडणीत म्हणजेच पर्यायाने व्यक्तिमत्व विकासात भाषेचे स्थान अनन्यसाधारण आहे. भाषा ही माणसाने निर्माण केलेली अभूतपूर्व संरचना मानवी विकासात भाषेला मैलाचा दगड मानता येईल. भाषांची निर्मिती आणि लिपींचा शोध यामुळे माणूस वेगाने प्रगती करू लागला. त्याने स्वत:चे वैशिष्ट्यपूर्ण जीवनमान विकसित केले. यामुळेच मानवी जीवनात भाषेला प्रचंड महत्त्व असलेले दिसते. भाषा शिकणे किंवा आत्मसात करणे म्हणजे भाषिक कौशल्यांचा विकास करणे होय. व्यक्तीने स्वत:मध्ये भाषिक कौशल्ये विकसित केल्यानंतर आपोआपच त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास होतो. त्याचे व्यक्तिमत्व प्रभावी होऊ लागते.

श्रवण, भाषण, वाचन, लेखन व संभाषण ही भाषिक कौशल्ये मानली जातात. या भाषिक कौशल्यांचा विकास साधून व्यक्ती स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण करत राहते. श्रवण हे पहिले महत्त्वाचे भाषिक कौशल्य आहे. हे पायाभूत कौशल्य आकलनाशी संबंधित आहे. ऐकणे ( hearing ) आणि श्रवण ( listening ) या दोन क्रियांमध्ये मूलभूत फरक आहे.

Teacher's Signature .......

PAGE NO.:
DATE

कानावर पडणारे सर्व ध्वनी, सर्व आवाज आपणास ऐकू येतात. मात्र त्यातील काही ध्वनीच आपण लक्षपूर्वक ऐकतो. आसपासचे सर्व ध्वनी कर्णेंद्रियाद्वारे जाणवणे म्हणजे ऐकणे होय, तर विशिष्ट ध्वनी लक्षपूर्वक ऐकणे म्हणजे श्रवण होय.

वाचन म्हणजे 'वाचन' ही लिखित चिन्हांची मालिका पाहण्याची आणि त्यांच्याकडून अर्थ प्राप्त करण्याची प्रक्रिया आहे. जेव्हा आपण वाचतो, तेव्हा आपण लिखित चिन्हे (अक्षरे, विरामचिन्हे आणि मोकळी जागा) प्राप्त करण्यासाठी आपले डोळे वापरतो आणि आपण आपल्या मेंदूचा वापर त्यांना शब्द, वाक्य आणि परिच्छेदांमध्ये रूपांतरित करण्यासाठी करतो जे आपल्याशी काहीतरी संवाद साधतात.

वाचन शांत (आपल्या डोक्यात) किंवा मोठ्याने असू शकते (जेणेकरून इतर लोक ऐकू शकतील).

वाचन हे एक ग्रहणक्षमता आहे. - त्यातून आपल्याला माहिती मिळते. परंतु वाचनाच्या गुंतागुंतीचा प्रक्रियेसाठी बोलण्याचे कौशल्य देखील आवश्यक आहे, जेणेकरून आपण वाचलेल्या शब्दांचा उच्चार करू शकतो. या अर्थाने, वाचन हे देखील एक उत्पादक कौशल्य आहे. ज्यामध्ये आपण माहिती प्राप्त करतो आणि ती प्रसारित करतो (जरी फक्त आपल्यापर्यंतच)

वाचन हे चार भाषा कौशल्यांपैकी तिसरे आहे, जे आहेत : ऐकणे, बोलणे, वाचन, लेखन.

Teacher's Signature .......

PAGE NO.:
DATE

आपल्या स्वतःच्या भाषेत, वाचन हे सहसा आपण शिकत असलेले तिसरे भाषा कौशल्य असते.

- वाचणे हा एक उत्तम छंद आहे. वाचन वेगवेगळ्या भाषेत करता येते. मातृभाषेतून केलेले वाचन वाचायला आणि समजायला सोपे जाते. मराठीतून वाचन करण्यासाठी भरपूर साहित्य उपलब्ध आहे. वाचनाने माणूस ज्ञानी होतो. वाचन पुस्तके, वर्तमान पत्र, सोशल मीडिया या द्वारे वाचन करता येते. आणि त्याला पुस्तकाच्या रूपाने एक नवीन मित्र मिळतो. वाचन ही एक कला आहे. वाचन माणसाला माणूस बनविते, जीवनाला एक नवी दिशा देते, विचार करायला शिकवते, अंतर्मुख करविते. त्याचप्रमाणे जीवनात योग्य - अयोग्य काय याची जाणीव करून देते. आपल्या समाजात 'वाचाल तर वाचाल' अशी म्हण प्रचलित आहे. संस्कृत मध्ये वाचन हा शब्द वच् या धातूपासून तयार झाला असून वच म्हणजे बोलणे, आणि वाच म्हणजे बोलावयास लावणारे, अर्थात वाचन असेल तरच वचनात सक्षमता येऊ शकते.

- केवळ काळानुसार मात्र वाचनाचा प्राधान्यक्रम, त्याची भाषा आणि विषय यांच्यात बदल झाला आहे, पै यांच्या म्हणण्यानुसार सध्या चरित्र हा प्रकार सर्वाधिक वाचनात येतो. अलिकडच्या दोन महिन्यांमध्ये प्रसिद्ध झालेले

Teacher's Signature .......

PAGE NO.:
DATE

खुल्लमखुल्ला हे अभिनेता ऋषी कपूर यांचे चरित्र, नाना पाटेकर यांचे नाना, ओम पुरी, आशा पारेख, कपिलदेव, रेखा यांचे चरित्र तसेच 'सैनिक' आणि सुमारे दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेले माजी क्रिकेटपटू सचिन तेंडुलकर 'प्लेइंग इट माय वे' हे आत्मचरित्र आजही हातोहात खपत आहे. युवा वर्गावर सध्या या साहित्य प्रकारचे गारुड असल्याचे पै यांचे निरीक्षण आहे. यासोबत अनेक अनुवादित पुस्तकांवर तरुण वाचकांच्या उड्या पडतात पुरुष व महिला यांच्यात साहजिकच महिलांमध्येच वाचनप्रेम अधिक दिसून येते, असेही ते सांगतात. कामाच्या व्यापातून खास वाचनासाठी वेळ काढणे तसे सर्वांनाच अवघड असले तरी महिला ते खुबीने करतात. आपल्या शिक्षणाच्या, व्यवसायाच्या नोकरीच्या किंवा कामाच्या संबंधित विषयाच्या पुस्तकांना निकडीमुळे वाचनात प्राधान्य दिले जात आहे. नोकरी किंवा अगदी शालेय शिक्षणातला ताण असह्य होऊ लागल्याने यासाठी काहीवेळेला आवडीलासुद्धा बाजूला ठेवले जाते.

वाचनालयाच्या प्रगतीमध्ये सर्वांत मोठा अडथळा असतो तो निधी उभारण्याचा. सरकारी अनुदान किंवा अगदीच नाममात्र फी यामुळे नव्या पुस्तकांची खरेदी किंवा काहीवेळा तर वाचनालयात काम करणाऱ्या स्टाफच्या पगारदेखील निधू शकत नाही. त्यामुळे त्यांनी निधी उभारण्याचे नवे पर्याय ~~ह~~ चोखंदळावेत, अशी सूचना ठाणे मराठी ग्रंथसंग्रहालयातील माजी ग्रंथपाल विनिती गोखले यांनी केली आहे. या ग्रंथसंग्रहालयाला वाचकांचे प्रारंभापासून

Teacher's Signature .......

भक्कम पाठबळ लाभले. पण काळाच्या ओघात येथील सभागृह विविध दर्जेदार कार्यक्रमांसाठी भाड्याने देऊन त्या निधीचा वापर वाचक चळवळ जोपासण्यासाठी करण्याची कल्पकता या वाचनालयाने दाखवली. तसे अनेक पर्याय ग्रंथालयांनी विचारात घ्यावेत, असे गोखले यांचे म्हणणे आहे.

• 'ओल्ड इज गोल्ड'

मराठीतील जुन्या पुस्तकांना मागणी कायम आहे. केवळ वयाची साठी उलटलेले निवृत्त नागरिकच नाही तर तरुणही पु.ल. देशपांडे, व. पु. काळे, पु. भा. भावे, विश्राम बेडेकर, दुर्गा भागवत, नारायण धारप, गो. नी. दांडेकर, जी. ए. कुलकर्णी, जयवंत दळवी, व्यंकटेश माडगूळकर, विजया राजाध्यक्ष यांना वाचणारा वर्ग आहे. हाच तरुणवर्ग सुहास शिरवळकर, रत्नाकर मतकरी यांच्या गूढकथांवरसुद्धा प्रेम करतो. त्यामुळे वाचनसंस्कृती लोप पावत चालली आहे किंवा होणार आहे. यासारख्या गप्पांना घाबरण्याचे कारण आता तरी दिसत नाहि. या गप्पासुद्धा वाचन न करणारी मंडळीच अधिकवेळा मारताना दिसतात त्यामुळे त्यामध्ये काहीच तथ्य नाही. वाचनसंस्कृती लोप पावणार नाही तर केवळ या वाचनाचे माध्यम बदलत असेल आणि एका माध्यमातून दुसऱ्या माध्यमात त्याचा प्रसार कालानुरूप होत राहणार आहे.

Teacher's Signature .......

PAGE NO.:
DATE

कल्याण येथील सार्वजनिक वाचनालयाच्या कम्प्युटरायजेशनची मुहूर्तमेढ सन 2003 मध्ये तत्कालीन अध्यक्ष अ. ना. भार्गवे आणि सरचिटणीस प्रशांत मुल्हेरकर यांनी रोवली. सध्या जो दुर्मिळ पुस्तकांचा खजिना या वाचनालयात शेकडोंच्या संख्येने उपलब्ध आहे, तो काळाच्या ओघात नष्ट होण्याची भीती आहे. तो आहे त्याच स्वरूपात टिकवून ठेवणे अत्यंत कठीण काम असल्याने ई बुकची कल्पना आपण प्रत्यक्षात आणली. असे सध्याचे राज्य ग्रंथालय संघाचे राज्य प्रतिनिधी मुल्हेरकर सांगतात. पूर्वी एखाद्या वाचकाने मागितलेले पुस्तक वाचनालयात उपलब्ध आहे की नाही किंवा कोणत्या वाचकाकडे ते आहे हे तपासण्यासाठी त्यावेळी शेकडो याद्या तपासाव्या लागत. त्यावर नाहक वेळ खर्च होत असे. त्यामुळे वाचनालयाचे कम्प्युटरायजेशन हा त्यावरचा तंत्रज्ञानाने दिलेला तोडगा सार्वजनिक वाचनालयाने स्वीकारल्याचे त्यांनी सांगितले. त्यापुढची आवृत्ती म्हणजे सध्या वाचनालयाने सुरू केलेले ॲप्लिकेशन.

• सोशल मीडिया प्लॅटफॉर्म आणि व्हिडिओ-सामायिकरण वेबसाईट जलद, सहज पचण्याजोग्या सामग्रीवर भरभराट करतात. मुलांना चाव्याच्या आकाराच्या तुकड्यांमध्ये माहिती वापरण्याची सवय होते. ज्यामुळे त्यांना पुस्तके किंवा अगदी पूर्ण लांबीच्या लेखांवर लक्ष केंद्रित करणे आव्हानात्मक होते.

Teacher's Signature .......

Date :
Page :

## * वाचनसंस्कृती म्हणजे काय ?

वाचन , मनन , चिंतन ही माणसाच्या उत्कर्षाची साधनं आहेत. वाचन म्हणजे फक्त अक्षरवाचनच नव्हे . वाचनाची संस्कृती एकदा आपलीशी केली , की समाज , देश वाचता आला पाहिजे जगाच्या तुलनेत आपण कसे , कुठं आहोत , हेही वाचता आलं पाहिजे . वाचन करणं , म्हणजे विचार करण्याची सवय लावणं त्यामुळे अर्थातच आपलं जगणंही समृद्ध होत जातं.

## * वाचन संस्कृतीचा विकास काळाची गरज *

वाचन संस्कृती

'वाचाल तर वाचाल' ही म्हण आजच्या घडीला किती समर्पक आहे हे आपण सर्वच जाणतो. आजच्या मनुष्याच्या ठिकाणी असणारे ज्ञान ही त्याची फार मोठी शक्ती आहे. या शक्तीच्या साह्याने तो सुबुद्ध आणि प्रगल्भ तर होतोच परंतु त्याच्या कार्यसंस्कृतीवर सुद्धा त्याचा प्रभाव पडतो. मागल्या पिढीपेक्षा आताच्या पिढीचे वाचन अगदी अल्प झाले आहे अशी तक्रार सर्वच थरातून वाढले आहे. ती गोष्ठ सत्यही आहे. कारण वाचनाव्यतिरिक्त रेडिओ , टेलिव्हिजन , कंप्युटर , चित्रपट , नाटके , इतर मनोरंजनाची साधने इतकी जास्त वाढली आहेत की या सर्व गलबल्यात मनुष्याला वाचण्यासाठी निवांतपणाच निळे नसा झाला आहे.

पूर्वीच्या वेळी काळी सामाजिक व धार्मिक पारतंत्र्या मुळे आणि आजच्या काळात आधुनिकतावादाच्या रेट्यामुळे आपले वाचन अजूनही मर्यादितच आहे. माहिती - तंत्रज्ञान

AMAR KRISH

Teacher's Signature

झपाट्याने आपल्याला कवेत घेतयं हे खरं आहे पण म्हणून वाचनाकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. हा लेखनप्रपंच साऱ्यांचा वाचनाकडे बघण्याचा दृष्टिकोन बदलण्यासाठी केलेला आहे.

साधारणतः १०-१२ वर्षांपूर्वीची ग्रामीण भागातील शाळा - महाविद्यालयांची स्थिती पाहता ग्रंथालयाचा स्वतंत्र विभाग पाहायला मिळणे तसे दुर्मिळच ! आम्हीदेखील शाळेत शिकत असतांना अवांतर वाचनासाठी पुस्तके आणलेली आठवत नाही. किंबहुना तशी सोय देखील नव्हती. परंतु आज बदललेली परिस्थिती आणि सामाजिक गरज पाहता शासनाने शाळांमधून "ज्ञानचक्षु" "वाचनालय" उभारण्यासाठी निधी उपलब्ध करून दिला आहे. तसेच आमच्या शाळेत विद्यार्थ्यांच्या वाढदिवसानिमित्त शाळेला पुस्तके भेट देण्याचा अनोखा उपक्रम सुरू केला. ~~आहे~~ त्यामुळे शाळेचे ग्रंथालयही समृध्द झाले आणि मुलांना पुस्तकाचे महत्त्वही वाटू लागले. नुसती पुस्तके वाटून किंवा भेट देऊन उपयोग नाही तर दुपारच्या सत्रात एक तासिका शिक्षक आम्हाला वाचनासाठी द्यायचे.

आज शहरातील खाजगी शाळांमधील विद्यार्थ्यांवरचा अभ्यासाचा ताण व महाविद्यालयीन युवकांचे मोबाईलवेड, बिझी शेड्युल यातून या सर्वांना अवांतर वाचनाची संधी मिळायला हवी आणि अशी संधी उपलब्ध करून देण्यासाठी पालकांनी सतत प्रयत्नशील असायला हवे. टी.व्ही. मोबाईल मुलांच्या हातात देण्यापूर्वी त्यांना लहानपणापासूनच चित्रमय गोष्टींची पुस्तके हाताळायला देऊन कुतुहल जागृत करण्याचा प्रयत्न पालकांनी करायला हवा.

Teacher's Signature

आजवर जे महापुरूष घडले ते केवळ शिक्षणामुळे आणि वाचनामुळे. उदाहरण द्यायचं झालं तर क्रांतीसूर्य महात्मा फुले यांना शिक्षण घेण्यासाठी प्रचंड विरोध झालाच पण ते हटवादाने शिक्षित ~~घेण्यासाठी प्रचंड विरोध~~ झाले. शिक्षित असल्यामुळे ते पुण्यात ज्या ठिकाणी राहत होते, त्य मुस्लिम मोहल्ल्यात कबीर बीजक नावाचा ग्रंथ वाचण्या-साठी , केवळ वाचता येतं म्हणून महात्मा फुले यांना बोलावले जायचे. कबीरांच्या समतावादी विचारांचा प्रभाव फुले यांच्यावर पडला व ते सामाजिक क्रांतीच्या चळवळीचे अग्रणी बनले.

त्याचप्रमाणे डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि त्यांचे ग्रंथप्रेम सर्व जगाला ज्ञात आहे. बाबांचे वडिल सुबेदार रामजी आंबेडकर यांनी बाबांच्या वाचनाकडे विशेष लक्ष दिले होते. बालवयात बाबांना वाचनाची विलक्षण आवड रामजींमुळे निर्माण झाली. आर्थिक चाचणीच्या काळात बाबांच्या वडिलांनी आपल्या मुलीला लग्नात घातलेले दागिने गहाण ठेवून बाबांच्या वाचनासाठी पुस्तके आणून दिली बाबांच्या वाचनवेडामुळेच शिवचरित्राचे पहिले लेखक गुरुदेव कृष्णाजी केळुसकर प्रभावित झाले. आणि त्यांनी बाबांना वाचनासाठी पुस्तके उपलब्ध करून दिली , पुढे हेच आंबेडकर साऱ्या विश्वातील एक प्रजावंत विद्वान म्हणून ओळखले गेले. वाचनाच्या प्रभावातून असे बहुजनांचे उद्धारक घडले आहेत.

आजचा विचार करताना मुलांच्या वाचनासाठी शिक्षक आणि पालकवर्ग किती जागृत आहे ही चिंतनीय बाब आहे. अध्ययनासाठी व ज्ञान ग्रहणासाठी वाचन हे

अतिशय महत्त्वाचे कौशल्य आहे. सध्याच्या बदलत्या परिस्थितीत व माहिती तंत्रज्ञानाच्या युगात वाचन संस्कृती विसरून चालणार नाही. वाचनाने विद्यार्थ्यांचे व्यक्तिमत्व बहुआयामी बनते. खरं तर वाचनाची आवड मूल शाळेत दाखल होण्यापूर्वी घरातूनच लागायला हवी. हल्ली सगळीकडे आयांची एकच तक्रार असते, आमचं बाळ ना, हातात मोबाईल दिल्याशिवाय अथवा टी व्ही चालू केल्या-शिवाय जेवतच नाही, पण माझा प्रश्न असा आहे की, त्याला टी.व्ही. मोबाईल दाखवला कुणी? आपणच ना! की त्याने स्वतः मागितला? त्या एवजी छान रंगीत चित्रांची पुस्तकं त्यांचासमोर ठेवा, त्यांना ती उलट-सुलट करून बघू देत. त्यातील वेगवेगळे आकार, रंग त्यांना आवडतील. त्यांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न ते मूल करेल त्याला उत्सुकता वाटेल. त्याची मानसिक वाढ चांगली होई रामायण, महाभरतातील कथा ऐकूनच वाचनाची अभिरूची विकसित होईल. ~~[illegible]~~ संस्कारदिपिका, इसापनीती, तेनालीरामनच्या गोष्टी प्राणी-पक्षी यांची माहिती देणारे सहित्य, शास्त्रज्ञांच्या कथा, बडबडगीते, गाणी, संस्कार गीते, चरित्र यांचा समावेश असलेले साहित्य मुलांना बालवयातच दिले गेले पाहिजे.

वाचनामुळे मनोव्यापार तयार होतो. मुलांना नवनवी कल्पना सुचवतात. यातूनच त्यांची मानसिक वाढ होते. टी.व्ही वर कार्टून्सच्या माध्यमातून सुष्ट-दुष्ट प्रवृत्तींचा संघर्ष दाखवला जातो. परंतु त्यात कल्पनाशक्तीला वाव नसतो. वाचनामुळे ती क्षमता विकसित होते. पूर्वी संस्कृतीच्या श्लोकांचे वाचन-पठन हा वाणीचा उच्चारणां शुद्धतेसाठी उपाय सांगितला जायचा.

Teacher's Signature

Date :
Page :

अवघ्या महाराष्ट्राचं साहित्यिक वैभव म्हणजे "श्यामची आई
ही कलाकृती भावनांच्या आक्रंदनातून संस्कार घडवणारं,
घरोघरी पारायणं करावीत असं हे पुस्तक ज्यानं
महाराष्ट्रातल्या असंख्य पिढ्या घडवल्या आणि आजही ते
काम अविरतपणे चालू आहे. अशा सहित्याच्या वाचनातून
मुलांचा भावनिक विकास तर होतोच शिवाय पालकांनाही
संस्कारांची शिदोरी मिळते पुढच्या पिढीला देण्यासाठी।
तसेच शेरलॉक होम्सच्या रहस्यकथा, अकबर-बिरबलच्या
चार्तुर्य कथा यामुळे मुलांच्या व्यवहारज्ञानात भर पडते.
प्रत्येक गोष्टीकडे चौकस वृत्तीने पाहण्याची सवय लागते
महाविद्यालयीन जीवनात थोर पुरुषांची आत्मचरित्र, कथा,
कादंबऱ्या, नाटक, वैचारिक निबंध यांची गोडी लागली
पाहिजे. आत्मचरित्रातून मोठी माणसं कशी घडली हे
समजते. त्यातलच एखादं पुस्तक आयुष्याला कलाटणी
देऊ शकतं, एखादं पानं आयुष्य बदलून टाकू शकतं,
आणि एखादी वाक्य जीवनाचं ध्येय ठरवू शकतं,
एवढी ताकद वाचनात आहे.

कथा-कादंबऱ्यातील तात्त्विक भूमिका, ग्रामीण-
दलित साहित्य, आदिवासी साहित्य यांच्या वाचनातून
आपली वाटचाल वैचारिक साहित्याकडे होते. वैचारिक
प्रगल्भतेवर उभं राहित्यावर आपल्याला समाज कळतो.
~~वैचारिक प्रगल्भतेवर उभं सहित्यावर आपल्याला~~
साहित्यातून आपलं आत्मभान जागृत होतं आणि आत्म-
भान जागृत होणं हा मानवाचा विकासाचा टप्पा
मानला जातो. जगाचा आत्तापर्यंत जो विकास झाला
तो वाचनांमुळेच !

AMAR KRISH

Teacher's Signature

Date :
Page :

आपल्या आयुष्यावर दोन गोष्टींचा प्रभाव जास्त पडतो. एक आपले मित्र आणि दुसरे पुस्तक मग पुस्तकालाच आपलं मित्र बनवलं तर ! जिथे वाचन होते तिथे विचार होतात आणि हेच विचार आपल्यात आपले ध्येय ठरवायला आणि गाठायला मदतही करतात. पुस्तकातून ज्ञान आणि ज्ञानातून संपत्ती निर्माण होत असते. वाचनामुळे आपले भावविश्व अनुभवविश्व विस्तारते. जगातले सर्व अनुभव आपण घरबसल्या घेऊ शकतो. आणि एकाच जीवनात अनेक आयुष्य जगू शकतो.

आपण पूर्वीपासूनच आपला सांस्कृतिक वारसा लिखित साहित्याच्या वाचनातून जतन करत आलो आहोत. जगात जर कोणती संस्कृती श्रेष्ठ असेल तर ती म्हणजे "वाचन संस्कृती". वाचन संस्कृतीची नाळ प्रत्येक माणसाशी प्राचीन काळापासून जोडली गेली आहे. "वाचनाचा लळा, फुलवी जीवनाचा मळा" हे अगदी खरे आहे.

——— × ———

धन्यवाद

निबंध

Page No. Date / /20

नाव → संजय कविश्वर

कक्षा → शास्त्री प्रथम वर्ष

व्याकरण

विषय → "वाचन संस्कृति"

"निबंध"

कविकुलगुरु कालिदास

संस्कृत विश्वविद्यालय - रामटेक.

9284110675

ATLAS

# वाचन संस्कृति



- परिचय ⇒

वाचन संस्कृति म्हणजे ज्ञानाचा महासागर. पुस्तके, लेख, वृत्तपत्रे आणि साहित्य वाचनाची आवड आणि सवय. ही संस्कृती समाजाच्या बौद्धिक, सांस्कृतिक आणि नैतिक प्रगतीसाठी अत्यंत महत्त्वपूर्ण आहे. वाचन केवळ ज्ञानप्राप्तीचे साधन नसून, ते वैचारिक, भावनिक आणि आत्मिक विकासासाठीही उपयुक्त आहे. बदलत्या काळात वाचन संस्कृती कमी होत चालली दिसून येते. याचा विचार करणे फार गरजेचे आहे. पुस्तकामधून आपल्याला नवनवीन विचार, माहिती आणि ज्ञान मिळते. वाचन हे केवळ करमणुकीचे साधन नाही, तर मनुष्याच्या बौद्धिक आणि मानसिक प्रगतीचे एक महत्वपूर्ण साधन आहे.

- वाचन संस्कृतीचे महत्व ⇒

वाचनामुळे व्यक्तिमत्व समृद्ध होते. इतिहास, विज्ञान, तत्वज्ञान, साहित्य अशा विविध विषयावरील वाचन आपल्याला जगाचे विस्तृत आकलन देते. नियमित वाचनामुळे आपली विचारशक्ती, कल्पनाशक्ती आणि निरीक्षणशक्ती वाढते.

Teachers Signature________________

वाचनातून मानवी जीवनातील मूल्ये, संस्कृती परंपरा आणि भावनिक गोष्टींची जाणीव होते. वाचनामुळे भाषेची जाण वाढते आणि विचार शक्तीला चालना मिळते. विविध विषयांवर माहिती मिळाल्याने व्यक्तीची अभिव्यक्ती अधिक प्रभावी बनते. ग्रंथवाचन हे केवळ माहिती मिळवण्यासाठीच नसते, तर ते मनोरंजनाचेही साधन आहे. चांगल्या पुस्तकांचे वाचन मनःशांती देते आणि जीवनातील ताण-तणाव कमी करते. वाचनाच्या माध्यमातून आपण विविध विषयांची माहिती मिळवतो. विज्ञान, इतिहास, तत्वज्ञान, साहित्य अशा अनेक क्षेत्रांत ज्ञानसंपदा वाचनामुळे संपन्न होते.

वाचणे हा अतिशय उत्तम छंद आहे. वाचन वेगवेगळया भाषात करू शकतो. वाचन केल्याने आपली स्मरणशक्ती वाढत असते. वाचनाने माणसाच्या जीवनाला नवीन दिशा मिळते. आपल्याला विचार करायला शिकवते. जीवनातल्या इतर गोष्टींचे ज्ञान आपल्याला या वाचनाद्वारे प्राप्त होते. जीवनात योग्य - अयोग्य काय याची जाणीव करून देते. संस्कृत मध्ये वाचन हा शब्द वच् या धातुपासून तयार झाला आहे. वच् म्हणजे बोलणे. वाच म्हणजे बोलावयास लावणारे.

Teachers Signature____________

वाचन संस्कृति आणि समाजाची प्रगती -

वाचन संस्कृती ही समाजाच्या प्रगतीचा एक आरसा आहे. वाचनाने व्यक्तीला केवळ वैयक्तिक स्तरावरच नव्हे तर सामाजिक आणी राष्ट्रीय स्तरावरही प्रगती करण्यास मदत होते. एक वाचनप्रिय आणि सृजनशील असतो.

ज्ञानाविषयी प्रकार -

श्रवण वाचन
लेखन भाषण

वाचन विचार आणि आकलनाच्या प्रक्रियेत लेखनाचे पण महत्वाचे योगदान आहे. वाचना प्रमाणे लेखनाला पण तितकेच महत्त्व आहे. लोकांना प्रेरणा देण्यासाठी दिले जाणारे भाषणांसाठी आपल्याला अगोदर त्या गोष्टीचा वाचन. हे आपल्याला फार गरजेच आहे. वाचनापासून शब्दात आणि व्याकरणामध्ये आपल्यात सुधारणा येते. त्यापासून आपल्याला लिहिण्याची भाषण करण्याची व बोलण्याची क्षमता वाढत असते. वाचनाने आपल्या कल्पनाशक्ती, सूक्ष्म-बुद्धी आणि रचनात्मकता गोष्टींचा विकास होतो. वाचनाने आपले साहित्य आणि इतिहास यातील गोष्टींची जाणीव होत असते. संस्कृति, परंपरा आणि या समाजाला योग्य रूपा प्रमाणे आपण समजू शकतो.

PAGE NO.: 4
DATE.: / /

→ वाचन संस्कृती पुनर्जीवित कसे करावे-

पुस्तकालयांची संख्या वाढवून त्यांचा प्रचार - प्रसार करावा. विविध शाळा महाविद्यालये तसेच सार्वजनिक ठिकाणी पुस्तकालये उपलब्ध करून द्यावीत. वाचन सप्ताह किंवा वाचन अभियान अशा कार्यक्रमांच्या माध्यमातून लोकांना वाचनासाठी प्रोत्साहन करावे. आधुनिक काळातील तंत्रज्ञानाचा उपयोग करून, ऑडिओ बुक्स, ई-बुक्स आणि वाचनासाठी उपयुक्त मोबाईल ॲप्स उपलब्ध करून द्यावीत.

चांगल्या वाचकांना आणि लेखकांना सन्मानित करून वाचनाची गरज दाखवता येणार.

साहित्य उत्सव, पुस्तक मेळे आणि ग्रंथ प्रदर्शनांच्या माध्यमातून वाचन संस्कृतीला चालना देता येईल. मुलांमध्ये वाचनाची गोडी निर्माण करण्यासाठी कुटुंब आणी शाळेने सक्रिय सहभाग घ्यावा. पालकांनी मुलांसमोर वाचनाचा आदर्श ठेवावा त्यांना चांगल्या पुस्तकांची ओळख करून द्यावी. वाचनालयाच्या प्रगतीमुळे सर्वात मोठा अडथळा असतो तो निधी उभारण्याचा. वाचन हे एक सहनक्षमता आहे.

Teachers Signature

वाचन संस्कृती कमी होण्याची कारणे -

तंत्रज्ञानाचा वाढता प्रभाव -
मोबाईल, टीव्ही आणी सोशल मिडीया यामुळे पुस्तके वाचण्याची आवड कमी होत चालली आहे.
धकाधकीच्या जीवनात लोक वाचनासाठी वेळ काढत नाहीत. सहयाच्या काळात माहिती मिळवण्यासाठी इंटरनेटवर अनेक पर्याय उपलब्ध असल्याने वाचनाला दुय्यम स्थान मिळाले आहे.
घरातील आणि शाळेतील वातावरणात वाचनासाठी पुरेसे प्रोत्साहन दिले जात नाही.

वाचन संस्कृतीची सद्यास्थिती -
काही मागील दशकाच्या काळापासून वाचन संस्कृतिवर तंत्रज्ञानाचा मोठा प्रभाव पडला दिसतो. आधी लोक पुस्तके वाचण्यात वेळ घालवत असत, आजच्या जमान्यात मोबाईल, टीव्ही, सोशल मीडिया यांनी जागा घेतली. वाचनाची जागा व्हिडीओ कंटेट, लघु व्हिडीओ आणी वेगवेगळ्या डिजिटल प्लॅटफॉर्मसने घेतली. तरुण पिढी वाचनापासून दूर होत आहे.
शाळामधील अभ्यासक्रमामध्येही वाचन संस्कृतीला पुरेसा प्रोत्साहन मिळत नाही.
झपाट्याने बदलत जीवनशैलीमुळे लोकांच्या वेळेचे नियोजन बदलले आहे, ज्यामुळे वाचनासाठी वेळ मिळत नाही.

निष्कर्ष ⇒

वाचन संस्कृती ही जीवनाचा अविभाज्य भाग आहे. हे सर्व टिकवण्यासाठी आणि वाढविण्यासाठी आपल्याला एकत्रित प्रयत्न करावे लागणार. वाचन हे केवळ ज्ञानार्जनाचे साधन नाही, तर ते जीवनातील चिरंतन आनंदाचा मार्ग आहे. म्हणून, वाचनाची सवय लावणे आणि ती पुढील पिढ्यांपर्यंत पोहोचवणे हे आपले कर्तव्य आहे.

वाचन ही एक आपली जीवनशैली बनवली पाहिजे. वाचनामुळे आपण केवळ शहाणेच नाही तर अधिक संवेदनशील आणि जागरूक नागरिक बनतो. म्हणूनच "वाचन आहे ज्ञानाचा मार्ग" ही म्हण आपल्याला सतत आठवण करून देते की, वाचन ही आपली सर्वांगीण प्रगतीची गुरुकिल्ली आहे. वाचन हे लिखीत चिन्हांची माहिती पाहण्याची आणि त्यांच्याकडून अर्थ ज्ञान प्राप्त करण्याची एक प्रक्रिया आहे. श्रवण - भाषण - लेखन - वाचन संभाषण ही भाषिक कौशल्ये माणसास दिसून येतो या भाषिक कौशल्या पासून माणूस विकास साधून स्वतःच्या व्यक्तिमत्वाची जडणघडण करतो. वाचन हे आपल्या जीवनासाठी उत्तम प्रकारे गरजेचे आहे. हीच वाचन संस्कृतीची महिमा आहे.

Teachers Signature

कथा परीक्षण

e No.

Date / /20

नाव ⇒ खुशबू वाढई

कक्षा → BBA द्वितीय वर्ष

विषय → पुस्तकांचे "परीक्षण" [ग्रंथाचे] स्पर्धा

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय रामटेक

9699383450

" महाभारत ग्रंथाचे परीक्षण " -



परिचय ⇒

महाभारत हा भारतीय संस्कृतीतील सर्वात मोठा आणि महत्वाचा ग्रंथ मानला जातो. जगातील सर्वात विस्तृत महाकाव्य असून त्यामध्ये एक लाख श्लोक आहेत. महर्षी व्यास यांनी रचलेला हा ग्रंथ केवळ एका कथेपुरता मर्यादित नाही, तर तो जीवनाचे दर्शन घडवणारा आहे.

सारांश :-

महाभारताची मुख्य कथा कौरव आणि पांडव यांच्यातील संघर्षाभोवती फिरते. हा संघर्ष राज्यसत्ता, क्रोध, आणि मानवी भावनांचा परिपाक आहे.

ग्रंथाचे मुख्य विभाग

आदिपर्व : ग्रंथाची प्रस्तावना, पांडव आणि कौरवांचा जन्म.

सभापर्व : पांडवांचे राज्य हरवणे (जुगार खेळामुळे).

विराटपर्व : पांडवांचा अज्ञातवास.

उद्योगपर्व : युद्धाची तयारी.

भीष्मपर्व : युद्धाचा आरंभ आणि श्रीकृष्णाने गीता उपदेश.

द्रोणपर्व, कर्णपर्व, शल्यपर्व : युद्धाचे विविध टप्पे

स्वर्गारोहणपर्व : पांडवांचे जीवनाचा शेवट व स्वर्गारोहण

कर्मयोग आणि मानवतावादाचा संदेश श्रीमद्भगवद्गीतेतून मिळतो.
प्रत्येक कर्माला परिणाम असतो, म्हणून विचारपूर्वक निर्णय घ्यावे.

चांगले आणि वाईट मुद्दे

चांगले : मानवी जीवनातील प्रत्येक पैलूला स्पर्श करणारा ग्रंथ.
तत्वज्ञान, धर्म, न्याय, आणि नैतिकता यांचे उत्तम विवेचन.
पात्रे आणि कथानकामुळे वाचकाला विचार करायला प्रवृत्त करणारा ग्रंथ.

वाईट : ग्रंथ खूप मोठा असल्यामुळे सामान्य वाचकांसाठी जड वाटू शकतो.
काही पात्रांची नकारात्मक बाजू खूप ठळकपणे दर्शविली गेली आहे. त्यामुळे त्यांना योग्य न्याय मिळत नाही (उदा. कर्ण, शकुनी).

प्रभाव आणि महत्व

महाभारत हा ग्रंथ फक्त भारतापुरता मर्यादित नाही. त्याचा प्रभाव जगभरातील साहित्य, तत्वज्ञान, आणि धर्मावर पडला आहे.
श्रीमद्भगवद्गीता ही महाभारताचा सर्वात महत्वाचा भाग आहे, जिथे श्रीकृष्णाने जीवनाचे तत्वज्ञान दिले आहे.

लेखकाचे उद्दिष्ट ⇒

महर्षी व्यास यांनी "महाभारत" या ग्रंथाच्या माध्यमातून धर्म आणि अधर्म, सत्य आणि असत्य, न्याय आणि अन्याय यांचे विवेचन केले आहे. त्यांनी दाखवले की, मानवी आयुष्य हे सतत संघर्ष आणि निवडींनी भरलेले आहे.

साहित्यिक मूल्यांकन -

भाषा : मूळ महाभारत संस्कृत भाषेत असून त्याची भाषा अलंकारिक आणि तत्त्वज्ञानपूर्ण आहे. प्रत्येक प्रसंगात प्रतीके, रूपके, आणि आशयाचे वैविध्य दिसते.

कथानक : महाभारताचे कथानक विस्तृत असून ते मानवी भावनांचा आरसा आहे. प्रत्येक पात्राच्या वर्तनामागील कारणमीमांसा आणि विचारसरणी मांडण्यात आली आहे.

पात्रे : महाभारतातील पात्रे ही अतिशय बहुआयामी आहेत. उदाहरणार्थ:

कृष्ण : देवत्व आणि कूटनीतीचे प्रतीक.

अर्जुन : शौर्य, धर्म, आणि शंका यांचे प्रतिनिधित्व

दुर्योधन : लोभ आणि अभिमानाचा प्रतीक.

कर्ण : शूरता आणि दुर्दैव यांचा संगम.

संदेश : जीवनात धर्म महत्त्वाचा आहे, परंतु त्याचा अर्थ परिस्थितीनुसार बदलतो.

निष्कर्ष :-

महाभारत हा केवळ एक ऐतिहासिक ग्रंथ नाही, तर तो जीवनाचा आरसा आहे. त्यातील कथा, पात्रे आणि विचार हे मानवी जीवनाचे आदर्श, नैतिकता, आणि मार्गदर्शक आहेत. प्रत्येक पिढीने हा ग्रंथ वाचावा आणि त्यातून मिळणारे तत्त्वज्ञान आत्मसात करावे.

वाचकांसाठी शिफारस

महाभारत सर्व वयोगटांसाठी उपयुक्त आहे प्रगल्भ विचार करणाऱ्या व्यक्तींनी त्याचा सखोल अभ्यास केला पाहिजे.

Page No. Date / /20 कक्षा.

नाम →

संजय कविश्वर

कक्षा →

शास्त्री प्रथम वर्ष

व्याकरण

विषय →

पुस्तकाये परीक्षण

स्पर्धा

कविकुलगुरु कालिदास संस्कृत

विश्वविद्यालय रामटेक -

9284110675

ATLAS

# महानुभाव पंथाचे परीक्षण

PAGE NO.: 1
DATE: / /

स्थापना → परिचय ⇒

महानुभाव पंथाची स्थापना 12 व्या शतकात भगवान श्रीचक्रधर स्वामी यांनी महाराष्ट्रात केली.

धार्मिक व सामाजिक चळवळ
एकेश्वरवाद, साधेपणा, आणि नैतिकतेचा प्रचार.

ज्ञानेश्वरांच्या काही काळ आधी महानुभाव संप्रदाय महाराष्ट्रात उदयास आला आणि मराठी भाषेचा आद्य मराठी ग्रंथ लीळाचरित्र लिहीला गेला.
" महान अनुभवोस्तेजा बल वा यस्य सः महानुभावः" या दृष्टीने मोठा तेजाने युक्त असलेल्या लोकांचा मार्ग तो महानुभाव पंथ असे म्हणले जाते.

विचार / मुख्य तत्वे ⇒

भगवान श्रीचक्रधर स्वामी यांनी मानवजातीला सामाजिक समानतेचा संदेश दिला. त्यांनी जातीभेद, भेदभाव, आणि अंधश्रद्धांचा विरोध केला. स्त्रीयांसाठी विशेष आदर या शिकवणीत दिसून येते.
साधेपणा - जीवनात संयम व साधेपणा महत्वाचा आहे.
वैराग्य - भौतिक सुखांपासून अलिप्त राहणे.
फक्त एकच ईश्वर आहे त्याची उपासना करावी.

Teachers Signature____________

महानुभावांचा प्रभाव - साहित्यिक योगदान -

महाराष्ट्रातील लोकांच्या जीवनशैलीवर आणि विचारसरणीवर मोठा प्रभाव टाकून महानुभाव पंथाच्या शिकवणींचा प्रभाव दिसून येतो. हा पंथ सामाजिक सुधारणांचा आधारस्तंभ ठरला आहे.

महानुभाव साहित्याने मराठी भाषेला धार्मिक आणि वैचारिक अभिव्यक्तीची दिशा दिली.

लीळाचरित्र : भगवान श्रीकृष्णाच्या आणि श्रीचक्रधर स्वामींच्या लीळांचे वर्णन करणारा ग्रंथ.

सूत्रपाठ : महानुभाव पंथाचे धार्मिक तत्त्वज्ञान.

या पंथामुळे मराठी भाषेला वैचारिक आणि धार्मिक अभिव्यक्तीचे एक नवीन माध्यम मिळाले.

साहित्य -

श्रीचक्रधरोक्त सूत्रपाठाप्रमाणेच गीता हा या पंथाचा प्रमुख धर्मग्रंथ असून श्रीकृष्णलीला वर्णन करणारे भागवत प्रमाण मानतात. श्रीकृष्ण महाराज श्री दत्तात्रेयप्रभु श्री चांगदेवराऊळ श्रीगोविंदप्रभु व स्वतः श्रीचक्रधरस्वामी असे पाच परमेश्वर अवतार मानीत असतो. श्री दत्तात्रेय प्रभु श्री कृष्ण महाराज आणि श्री चक्रधरस्वामी हे उभयदृश्य पूर्वावतार आहेत.

नागदेवाचार्य हे चक्रधरांचे पट्टशिष्य व पंथाचे पहिले आचार्य, चक्रधरांचे शीष्य म्हणून दिसून येत असतो.

Teachers Signature

प्रमुख ग्रंथ - ग्रंथी -
लीळाचरित्र - दृष्टांत पाठ - स्मृतिस्थळ - वृद्धाचार
शिशुपालवध - वछाहरण - उद्धवगीता - पूजावसर -

सर्वज्ञ श्री चक्रधर स्वामी - महदंबा - नागदेवाचार्य -
माहीमभट - परसरामबास - गोविंद प्रभु - केशिराज व्यास.

महानुभाव पंथाचा भाषा समन्वय:-
महानुभाव पथांतील अनुवादाची परंपरा समजून घेतांना आपणास तत्कालीन भाषिक समजूत घेऊन चक्रधर स्वामींनी लोकांच्या तोंडी असलेली भाषा प्राकृतला - मराठीला ग्रंथवाणीचा दर्जा त्यांनी मिळवून दिला. मराठी महानुभावाची धर्मभाषा असल्यामुळे पंथातील सर्वच ग्रंथांची निर्मीती मराठीतूनच झाली.

निष्कर्ष -
महानुभाव पंथ हा केवळ धार्मिक आंदोलन नव्हता, तर सामाजिक सुधारणेचा प्रभावी प्रयत्न होता. भगवान श्री चक्रधर स्वामी यांनी समाजाला धार्मिक आणि नैतिकतेचा मार्ग दाखवला. त्यांच्या शिकवणी आजही मानवजातीसाठी उपयुक्त आणि मार्गदर्शक आहेत.
महानुभाव पंथाच्या तत्वज्ञानाच्या अभ्यास केल्यास जीवनातील साधेपणा, शांती, आणि धार्मिकता कशी साधता येईल याचा मार्ग स्पष्ट होतो.

Teachers Signature

# अभिज्ञान शांकुतला का सारांश लेखन

अभिज्ञान शकुंतला महाकवि कालिदास द्वारा रचित एक प्रसिद्ध नाटक है। यह नाटक प्राचीन भारतीय साहित्य की एक महत्वपूर्ण कृति है और इसमें प्रेम, गन्धर्व विवाह, विरह और नैतिकता के विषयों को विस्तार से बताया गया है।

राजा दुष्यंत वन मे शिकार करने जाते हैं और वहां शकुंतला नाम की एक सुंदर और पवित्र युवती से मिलते है। शकुंतला एक ऋषि की पुत्री है और वह वन में रहती है। राजा दुष्यंत और शकुंतला एक दूसरे से प्रेम करने लगते हैं और वे गंधर्व विवाह कर लेते है।

लेकिन जब राजा दुष्यंत अपने राज्य मे वापस जाते है, तो वह शकुंतला को भूल जाते हैं। शकुंतला गर्भवती हो जाती है। ~~और वह~~ लेकिन राजा दुष्यंत उसे पहचान नहीं ~~पा~~ पाते है।

और उसे अपनी पत्नी के रूप मे स्वीकार नहीं करते हैं।

शकुंतला को बहुत दुःख होता है और वह वन में वापस चली जाती है। वहां उसका पुत्र भरत पैदा होता है, जो बाद मे एक महान राजा बनता है। अंत मे, राजा दुष्यंत को अपनी गलती का एहसास होता है और वह शकुंतला को अपनी पत्नी के रूप मे स्वीकार करते हैं।

अभिज्ञान शाकुंतलम एक प्रेम कहानी है जो प्रेम, विरह और नैतिकता के विषयो को विस्तार से बताती है। यह नाटक प्राचीन भारतीय साहित्य की एक महत्वपूर्ण कृति है और इसे आज भी पढ़ा और प्रदर्शित किया जाता है।

---X---

Teachers Signature

नाम → खुशबू पाठई

कक्षा → BBA द्वितिय वर्ष

विषय → ग्रंथाची "सार" लेखन

कविकुलगुरु कालिदास संस्कृत

विश्वविद्यालय रामटेक

9699383450

# शिशुपालवध

## "सारांश"

शिशुपालवध हा संस्कृतमधील महान काव्यग्रंथ आहे. महाकवी माघ यांनी शिशुपालवध या ग्रंथाची रचना केली आहे. अलंकार शिल्प आणि भाषेच्या सौंदर्यासाठी हा ग्रंथ संस्कृत साहित्यात विशेष मानलेला आहे. हा काव्य महाभारताच्या एका प्रसंगावर असून यात भगवान श्रीकृष्णानी आपला शत्रु शिशुपाल याचा वध केला हे दर्शविलेल आहे.

शिशुपालवध ग्रंथ 20 सर्गामध्ये (अध्याय) विभागलेला आहे. अलंकार पूर्ण भाषेत प्रत्येक सर्गाची रचना आहे. शिशुपालाने श्रीकृष्णाचा वारंवार अपमान केल. त्यामुळे श्रीकृष्णाने शिशुपालचा वध केला. या महाकाव्यामध्ये पांडवानी आयोजीत केलेल्या राजसूय यज्ञ. त्यामध्ये अग्रपूजेसाठी श्रीकृष्णाची निवड आणि शिशुपालाचा विरोध हे मुख्य घटनांचा समावेश आहे.

हा ग्रन्थ संस्कृतच्या सहा महाकाव्यात मोजला जातो. काव्यामध्ये उपमा, अनुप्रास, रूपक, आणि श्लेष अलंकाराचा चांगला वापर आहे. हा काव्य सत्य धर्म आणि न्यायाच्या महत्वावर भर देते. या काव्याची तुलना "महाकवि कालिदास' यांच्या रघुवंश आणि भारवि यांच्या किरातार्जुनीयम् यासोबत केली जाते. पांडवानी हस्तिनापुरात राजसूय यज्ञ आयोजित करून राजे आणि विद्वान पुरूषांना निमंत्रीत केलं. श्रीकृष्णाला त्यात अग्रपूजेच सन्मान दील. पण शिशुपालला हे मान्य नव्हत त्यांनी सभेत श्रीकृष्णाला अपमान केला. श्रीकृष्णानी शिशुपालला पुर्वी 100 अपराध माफ करण्याचे वचन दिल होत.

शिशुपालाने १०० अपराधापेक्षा अधिक केले कृष्णाने सुदर्शन चक्राने वध केला.

शिशुपालवध महाकाव्य अहंकार अपमान आणि अन्याय याने परिणाम दाखवते श्रीकृष्णाची भूमिका न्याय आणि धर्माचे रक्षणाकरिता आदर्श ठरते. राजसूय यादन्याला चांगले बनवण्यासाठी भारतातील महान महान ऋषि आले होते. भगवान वेद व्यास, भारद्वाज, सुमन्तु, गौतम, वशिष्ठ, कण्व, मैत्रेय, विश्वामित्र, वामदेव, सुमति, जैमिनि, पाराशर गर्ग, वैशम्पायन, अथर्वा, कश्यप धौम्य, परशुराम, शुक्राचार्य, आसुरि वीतहोत्र, मधुच्छन्दा, वीरसेन, अकृतव्रण. हे सर्व महान ऋषि आले होते.

००० ०००

Page No. Date / /20 कथा.

नाम →

संजय कविश्वर

कक्षा →

शास्त्री प्रथम वर्ष

व्याकरण

विषय →

पुस्तकीय परीक्षण

स्पर्धा

कविकुलगुरु कालिदास संस्कृत

विश्वविद्यालय रामटेक -

9284110675

ATLAS

# मुद्राराक्षस

PAGE NO.: 1
DATE: / /

## सारांश

मुद्राराक्षस विशाखदत्त द्वारा रचित एक प्रसिद्ध संस्कृत नाटक आहे।
हे ग्रंथ प्राचीन भारतीय इतिहास और राजनीति पर आधारित इतिहासिक नाटक आहे।

नाटक मध्ये चाणक्य आणि राक्षस यांची योजनेचे कार्य पूर्ण राजनीतिक वैदग्ध्यसोबत दाखविला आहे. नाटकामध्ये घटनेबद्दल जी धारावाहिकता खुप चांगल्या प्रकारात दिसून येते. नाटकामध्ये चंद्रगुप्त च राज्यारोहणाच्या नंतर चाणक्य द्वारा राक्षसाची राजनीतिक चाल याला नष्ट करण्याची घटनाला सात अंकामध्ये दाखविलेली आहे.
हे नाटक सम्राट चंद्रगुप्त मौर्य सत्तेत आल्यावर सत्तेमध्ये आल्यावरची कहानी आहे.
मुद्राराक्षस चाणक्य (कौटिल्य) आणि चंद्रगुप्त मौर्य यांच्या जीवनावर आधारित आहे. यात चाणक्यपासून चंद्रगुप्त मौर्याला साम्राज्य च्या सिंहासनावर बसूवेपर्यंत आणि नंद वंश चा नाश करण्याची योजनेच वर्णन केल आहे.
या नाटकाच मुख्य उद्देश चाणक्य ची राजनीती आणि कूटनीति च प्रदर्शन दाखविण्याच आहे.
राक्षसांची स्वामी च्या राजाविषयी ईमानदारी आणि चाणक्याची राष्ट्रहितासाठी कार्य करण्याची भावना नाटकामध्ये दिसते.

Teachers Signature_______________

नाटक आपल्याला दर्शविते की राजनीति मध्ये सफलता होण्यासाठी कूटनीति आणि बुद्धिमत्ता ची गरज असते.

चाणक्य, नंद वंश यांच्या अत्याचारापासून कंटाळून चंद्रगुप्त मौर्याला साम्राज्य चा राजा बनवण्याचा संकल्प होतो. अमात्य राक्षस नंद वंशाचा प्रधानमंत्री असून चाणक्यची योजनेचा विरोध करीत असतो.

नाटकाच्या अंत मध्ये चाणक्य ची कूटनीती पाहून राक्षस चंद्रगुप्त मौर्याचे साथ द्यायला तयार होत असतात.

मुद्राराक्षस मध्ये नन्द वंशाचा नाश चन्द्रगुप्ताचा राज्यरोहण, राक्षसाचा विरोध चाणक्य ची राजनीति आणि शेवटी राक्षसापासून चन्द्रगुप्त मौर्य ची प्रभुत्व स्वीकृति याचा उल्लेख झाला आहे.

मुद्राराक्षस एक ऐतिहासिक आणि राजनीतिक नाटक आहे, जो असं दाखवते की बुद्धिमत्ता आणि कूटनीति याच्या बळावर कोणत्या पण कठिण परिस्थीती ला पार करू शकतो. हे नाटक चाणक्याची राजनीतिक कौशल आणि त्यांची योजनेला दर्शविते आहे.

Teachers Signature




# CHHATRAPATI SHIVAJI MAHARAJ MAHAVIDYALAYA

**Surla (Borda), Warora, Dist. Chandrapur (M.H.)**

Run By - SANAY BAHUUDDESHIYA SANSTHA, CHANDRAPUR (MAHA/F-13458/2014)

(Affiliated to Kavikulguru Kalidas Sanskrit University, Ramtek NAAC A+)

Office Address : Vivekanand Adhyapak Vidyalaya, Dwarka Nagari, Anandwan Chowk, Warora, Chandrapur (M.H.)

☎ : 9423117363, 8668420694, 9422875274 E-mail : csmcollege2022@gmail.com




Ref. No. : CSM/2025/09 Date : 20/01/2025



प्रति,

मा. ग्रंथपाल

कविकुलगुरू कालिदास संस्कृत

विद्यापीठ रामटेक जि. नागपूर.

**विषय :-** " वाचन संकल्प महाराष्ट्राचा" या उपक्रमातील घेतलेले विविध कार्यक्रम अहवाल

**महोदय,**

सविनय विनंती या प्रमाणे आहे की, छत्रपती शिवाजी महाराज महाविद्यालय सुर्ला (बोर्डा) वरोरा जि . चंद्रपूर येथे बी . ए प्रशासकीय सेवा व एम. ए लोकप्रशासन हा अभ्यासक्रम सुरु आहे वाचन संकल्प महाराष्ट्राचा या उपक्रमा अंतर्गत महाविद्यालयात पंधरवडा साजरा करण्यात आला असून त्यामध्ये ग्रंथप्रदर्शनी ,निबंध लेखन स्पर्धा , सामुहिक वाचन स्पर्धा , ग्रंथदिंडी , ग्रंथासार लेखन स्पर्धा , लेखक – विदयार्थी वाचक संवाद कार्यक्रम इत्यादी कार्यक्रम घेण्यात आले .

धन्यवाद !

सहपत्र

1. " वाचन संकल्प महाराष्ट्राचा "पंधरवडा अहवाल
2. ग्रंथसार
3. निबंध स्पर्धा

प्राचार्य
छत्रपती शिवाजी महाराज
महाविद्यालय, सुर्ला (बोर्डा)
ता.वरोरा जि.चंद्रपूर

# कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय रामटेक

**उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि .20 /12/2024 नुसार**

**छत्रपती शिवाजी महाराज महाविद्यालय सुर्ला ( बोर्डा ) ता वरोरा .जि चंद्रपूर** येथे

**" वाचन संकल्प महाराष्ट्राचा "**

पंधरवडा साजरा करण्यात आला .

## अहवाल

उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि 20/12/20 24 नुसार सर्व महाविद्यालय / शाळा मध्ये वाचन संकल्प महाराष्ट्राचा हा पंधरवडा साजरा करण्याचा आदेश प्राप्त झाला आहे .**त्यानुसार " छत्रपती शिवाजी महाराज महाविद्यालय सुर्ला ( बोर्डा ) येथे " वाचन संकल्प महाराष्ट्राचा " या उपक्रमांतर्गत दि 13 जानेवारी 2025 ते 18 जानेवारी 2025** या दरम्यान विविध स्पर्धा आयोजित करण्यात आल्या .

### 1 ) ग्रंथाप्रदर्शनी - दि 13 जानेवारी 2025

महाविद्यालयात 13 जानेवारी 2025 ला महाविद्यालयात ग्रंथ प्रदर्शनीचे आयोजन करण्यात आले होते तसेच सदर ग्रंथ प्रदर्शनीचे उद्घाटन महाविद्यालयाचे प्राचार्य मा. दिनकर गुरनुले सर यांच्या हस्ते करण्यात आले.या प्रदर्शनीत विविध विषयाचे ग्रंथ ठेवण्यात आले होते त्यात १७७

विद्यार्थ्यांनी या ग्रंथ प्रदर्शनीचा लाभ घेतला .



## 2 ) निबंध लेखन स्पर्धा - दि 14 जानेवारी 2025

**" वाचन संकल्प महाराष्ट्र "** चा या कार्यक्रमा अंतर्गत निबंध स्पर्धेचे आयोजन करण्यात आले होते .निबंधाचा विषय **" वाचन संस्कृती "** या विषयावर एकूण ८६ विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला .या स्पर्धेत

१ ) प्रथम क्रमांक – सुदर्शन बोकडे ( एम.ए .द्वितीय वर्ष )

२ ) द्वितीय क्रमांक – कु.शिवानी मोहुर्ले (बी.ए.प्रशासकीय सेवा तृतीय वर्ष )

३ ) तृतीय क्रमांक –कुं .वैष्णवी तुरारे (बी.ए.प्रशासकीय सेवा प्रथम वर्ष )

तसेच प्रोत्साहनपर कु. सानिया सलामे ( बी.ए.प्रशासकीय सेवा द्वितीय वर्ष )

कु. वैभव आसुटकर ( एम.ए.प्रथम वर्ष )

असे पाच पारितोषिकांचे वितरण दि .26 जानेवारी 2025 ला प्रजासत्ताक दिनाचे औचीत्य साधून पारितोषिक देण्यात येणार आहे .



## 3 ) सामुहिक वाचन स्पर्धा :- 15 जानेवारी 2025

**" वाचन संकल्प महाराष्ट्राचा "** उपक्रमा अंतर्गत महाविद्यालयाच्या वाचन कक्षात सामुहिक वाचन स्पर्धा घेण्यात आली .त्यात विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला आणि विविध विषयावरील ग्रंथांचे / पुस्तकांचे

वाचन केले .



## 4 ) ग्रंथदिंडी : - दि . 16 जानेवारी 2025

" वाचन संकल्प महाराष्ट्राचा " उपक्रमांतर्गत महाविद्यालयातर्फे ग्रंथदिंडीचे आयोजन दि .16 जानेवारी 2025 रोजी करण्यात आले .ग्रंथदिंडीचे उद्‌घाटन संस्थेचे अध्यक्ष मा. खरवडे सर यांच्या हस्ते करण्यात आले.सदर ग्रंथदिंडीत महाविद्यालयातील विदयार्थी व शिक्षक सहभागी झाले होते .ग्रंथदिंडी सकाळी 12 वाजता महाविद्यालय परिसरातून निघाली.



## 5 ) ग्रंथसार लेखन स्पर्धा :- दि .17 जानेवारी 2025

दि 17 जानेवारी 2025 रोजी विद्यार्थ्यांकरिता ग्रंठ्सार लेखन स्पर्धा घेण्यात आली .या स्पर्धेत एकूण 42 विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला व ग्रंथाविषयी आपली मते व्यक्त केली .

## 6 ) लेखक – विदयार्थी वाचक संवाद व कार्यक्रमाचा समारोप :- दि.18 जानेवारी 2025

**" वाचन संकल्प महाराष्ट्राचा "** उपक्रमांतर्गत 18 जानेवारी 2025 ला लेखक व विदयार्थी संवाद कार्यक्रम घेण्यात आला .सादर **कार्यक्रमास प्रमुख मार्गदर्शक ,म्हणून प्रा . सुनिल खरवडे सर** हे उपस्थित होते .त्यांनी विद्यार्थ्यांना वाचक कसा असावा व वाचनाचे जीवनात काय फायदे होतात याविषयी विद्यार्थ्याना मार्गदर्शन केले .

या कार्यक्रमास **अध्यक्ष म्हणून संस्थेचे अध्यक्ष मा.श्री . सुधाकरजी खरवडे सर तसेच महाविद्यालयाचे प्राचार्य मा.दिनकर गुरनुले सर** तसेच महाविद्यालयातील सर्व प्राध्यापक वर्ग व विदयार्थी उपस्थित होते . सदर कार्यक्रमास विद्यार्थ्यांचा भरपूर प्रतिसाद मिळाला .



**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 17/01/2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) प्रिया अनिल मोहितकर

Tittle (शीर्षक) 'युगंधर'

Author (लेखक) शिवाजी सावंत

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

'युगंधर' ही कादंबरीचे लेखक म्हणजेच शिवाजी सावंत श्रीकृष्णाला समजून घेण्याचा प्रयत्न करीत आहे. किंवा त्यांच्या-वरीवर पाहणाऱ्या लोकांच्या नजरेतून त्यांना समजून घेण्याचा प्रयत्न करीत आहे.

यामध्ये श्रीकृष्णाची कथा लेखक त्यांच्या जीवनातील वेग-वेगळ्या व्यक्तींद्वारे सांगतो. ज्यामध्ये स्वतःच्या समावेश देखील आहे. श्रीकृष्णाच्या भावनिक दृष्ट्या जवळचे लोक, गोकुळमधील बहीण ज्याबद्दल अनेकदा बोलले जात नाही, पांच्याशी असलेले नाते आणि पांच्याशी विशेष नाते असलेले इतर पुरुष यांसारख्या अनेक गोष्टी लेखक शिवाजी सावंत स्पष्ट करतात. श्रीकृष्णाने गोकुळमधील त्याचे बालपण आणि मथुरा आणि अवंती येथील सांदिपनी आश्रमातील दिवसांचे वर्णन केले आहे. तर इतर लोक त्याच्या उर्वरित आयुष्याची कहाणी सांगतात. रुक्मिणीने श्रीकृष्णा-शी केलेल्या तिच्या विवाहाची आणि भारताच्या पश्चिम किनाऱ्या-जवळील असलेल्या द्वारकेची गोष्ट सुद्धा सांगितली आहे.

**Recommendation (would you recommend this book ? Why?)** शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

खूपच सुंदर आहे कादंबरी. आपण वाचताना भारावून जातो. खरं तर शिवाजी सावंत ह्यांना श्रीकृष्णाच्या तोंडून आत्मचरित्र शैलीत संपूर्ण कथा करतु वांग्मयरी होती. परंतु एकट्या श्रीकृष्णानेच बोलणं एखाद्यातून त्याच्या गीतेच्या अनुषंगाने योग्य न वाटल्याने. मग त्यांनी युगंधरात बोलणारी सात पात्र निवडल्या श्रीकृष्ण, रुक्मिणी, दारुक, द्रौपदी, अर्जुन, सात्यकी व उद्धव.

प्रत्येक पात्र जणू जिवंत होवून संवाद साधतोय. कादंबरी ही गोकुळातील कृष्णलीले पासून सुरु होत, महाभारताचे पात्रानुरूप वर्णन करत, शेवटी यादवांचा शेवट देखील दाखवतो. जो श्रीकृष्णाच्या अवतार संपता संपता होतो. प्रश्न करत्याने ही कादंबरी वाचावी नक्की आवडेल.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 15/01/2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव ) :- Sudarshan Bharat Bokade

Tittle (शीर्षक) :- श्यामची आई

Author (लेखक) :- साने गुरुजी (पांडुरंग सदाशिव साने)

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश ) :-

"श्यामची आई" हे मराठीतील एक अमर साहित्यकृती आहे. साने गुरुजींनी आपल्या बालपणाच्या आठवणिंवर आधारित ही आत्मकथनात्मक कादंबरी लिहिली आहे. ही कथा श्याम नावाच्या एका लहान मुलाच्या आणि त्याच्या आईच्या निष्कलंक, प्रेमळ आणि त्यागमय नात्याची आहे. श्याम हा अत्यंत गरिब कुटुंबातील मुलगा आहे. त्याच्या आईचे प्रेम, शिकवण आणि संस्कार यामुळे तो उत्तम चारित्र्याचा घडतो. ही कथा आईच्या प्रेमाचे, त्यागाचे आणि मुलाच्या जीवनावर होणाऱ्या तिच्या संस्कारांच्या प्रभावाचे सुंदर चित्रण करते.

**Recommendation (would you recommend this book ?**
**Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

होय, विद्यार्थी आणि तरुण पिढीला-या पुस्तकातून त्यांना नैतिकता, प्रामाणिकपणा, कष्ट करण्याची वृत्ती आणि आई-वडिलांबद्दल आदर यांचे धडे मिळतात.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 15/01/2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) पियुष गजानन भास्कर

Tittle (शीर्षक) कोसला

Author (लेखक) भालचंद्र नेमाडे

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

भालचंद्र नेमाडे लिखित कोसला मराठी साहित्यातील एक महत्वाचे आणि हृदयस्पर्शी असे आत्मकथनात्मक कादंबरी आहे. या कादंबरीत सांगवीत तरुण पांडुरंग पाटील यांच्या जीवनप्रवासाचे वर्णन घडले. शहरी आणि ग्रामीण जीवनातील संघर्षमय, आधुनिक जीवनाच्या समस्या आणि स्वतःच्या अस्तित्वाचा शोध या गोष्टींवर कोसला प्रकाश टाकते. साध्या भाषेत परंतु खोल तत्वज्ञानाने भरलेली हि कथा वाचकाला अंतर्मुख करते.

**Recommendation (would you recommend this book ? Why?)** शिफारसी (तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

होय, कोसला वाचण्याचे कारण म्हणजे ती केवळ एक कथा नसून ती तरुणांच्या मनातील अस्वस्थतेचा आवाज आहे.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक)

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) वैष्णवी रामचंद्र भोयर

Tittle (शीषर्क) माझे सत्याचे प्रयोग

Author (लेखक) महात्मा गांधीजी

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

माझे सत्याचे प्रयोग ही महात्मा गांधींची आत्म-कथा आहे. गांधीजींनी जीवनभर कशी वाटचाल केली त्याचा मागोवा या पुस्तकामध्ये घेतला आहे. या पुस्तकात लहानपणापासून 1921 पर्यंतचे गांधीजींचे आयुष्य रेखाटले गेले आहे. दर आठवड्याला थोडे थोडे याप्रमाणे हे पुस्तक लिहिले गेले आणि 1925 ते 1929 या काळात ते त्यांच्या नवजीवन या नियतकालिकात प्रसिद्ध केले गेले. 'यंग इंडिया' मध्ये त्यांचे इंग्रजी भाषांतर छापले जायचे, स्वामी आनंद यांनी इंग्रजी भाषांतर छापले, आणि या संकल्पाला चालना दिली. आणि गांधीजींच्या इतर सहकाऱ्यांनी त्यांच्या सार्वजनिक लढ्याची पार्श्वभूमी जागतिक आध्यात्मिक व धार्मिक अधिकार असलेल्या लंडनच्या समितीने एक 'असा या पुस्तकाचा गौरव केला.

**Recommendation (would you recommend this book ? Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

___

___

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 16-1-2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) प्रतिक्षा कमलाकर उईके

Tittle (शीर्षक) अग्नि पंख

Author (लेखक) डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

अग्निपंख हे अतिशय सुंदर पुस्तक आहे. भारताचे माजी राष्ट्रपती डॉ. ए.पी.जे अब्दुल ~~कलाम~~ कलाम यांच्या जीवनावर प्रकाश टाकणारे हे पुस्तक आहे. यामध्ये त्यांच्या जीवनातील संघर्ष व अनुभव वर्णिला आहे. यामध्ये कलाम यांची कौटुंबिक माहिती त्यांनी सहन केलेली पीडा त्यांनी लावलेला शोध सर्वकाही अत्यंत प्रशंसनीय आहे. हे केवळ अब्दुल कलाम यांचे आत्मचरित्र नसुन स्वतंत्र भारताच्या तंत्रज्ञान विषयक लढाईचे स्पंदन आहे. हे पुस्तक फार प्रभावित करणारे आहे.

**Recommendation (would you recommend this book ?**
**Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

अग्निपंख या पुस्तकातुन आपल्याला जिवनामध्ये खुप काही संकटाला पार कसे करायचे ते शिकायला येते. म्हणुन मि तुम्हाला हे पुस्तक वाचायला सांगितले

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 16.01.2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) योगिता प्रणयसिंग बैस

Tittle (शीर्षक) 12th Fail

Author (लेखक) अनुराग पाठक

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

या पुस्तकामध्ये अनुराग पाठक यांनी मनोज शर्मा आणि साहायक पात्र म्हणजे त्यांच्या कुटुंब व मित्रांच्या अवती भवती सांगितले आहे. या पुस्तकामध्ये मनोज शर्मा यांच्या सोबत घडलेली सत्य घटना दर्शविली आहे. मनोज शर्मा हा बारावी फेल होवुन सुद्धा एक IPS ऑफीसर झाले. जे की समाजाच्या लोकांचे वाईट आयकुन सुद्धा तो निराश न होता सफल ठरला, या गोष्टी मुळे ही पुस्तक लिहण्यात आले आहे. त्यांच्या या सुंदर विचारावर हिंदी चित्रपठ बनविण्यात आला आहे. या पुस्तकामध्ये हे सांगण्यात आले की नापास असणे हे जिवनाचे अंत नाही तर सुरुवात पण असु शकते.

**Recommendation (would you recommend this book ?**

**Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

ही पुस्तक वाचल्यामुळे खुप प्रेरणा मिळाले व वाईट वेळा मध्ये एक हिम्मत मिळाले म्हणुन मी ही पुस्तक सगळ्या विद्यार्थ्यांना वाचण्यासाठी शिफारस करते.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) - 16-1-2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) - तेजस्वी मनोज आगलावे.

Tittle (शीर्षक) - मृत्युंजय

Author (लेखक) - शिवाजी सावंत

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश) -

पुस्तकाच्या पाहता पुस्तक जाड आणि मोठं वाटतही
असेल पण, एकदा ते वाचायला सुरुवात केल्यावर
घाई लागते. पुस्तकाचं जाडपणाचं भान आपोआप
उतरतं. सावंतांनी हे पुस्तक मातृभूमीच्या रक्षणार्थ
धारातीर्थी पतन पावणाऱ्या शूरवीरांना अर्पण
केलं आहे. पुस्तकाची प्रस्तावना आणि त्याचा अर्थ
मोठा व्यापती आहे. अर्हदान येथे लेखकाची
वाचकाप्रति आणि मतनीस प्रति समर्पणाची
भावना दिसून येते. या पुस्तकाच्या वाचनाचा
प्रवास जर तुम्हाला सुरु करायचा असेल.
तर आपल्याला याबद्दल थोडी माहिती हवी.
हे पुस्तक जरी कर्ण ह्या व्यक्ति रेखेभोवती फिरत
असेल. तरी त्याला तरी त्याला अनेक भाग आहे-

**Recommendation (would you recommend this book ?**

**Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

होय. मी नवीन किंवा मित्राला सांगेन मित्र कसा असावा.
आणि सर्व आपली तत्वे याबद्दल तसेच दानशूर पणा कसा
असावा. याचा मूर्तीमंत उदाहरण म्हणजे कर्ण आहे. या
पुस्तकातून समजून येते.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 16-1-2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) आचल वासुदेव कुरारे

Tittle (शीर्षक) 'श्यामची आई'

Author (लेखक) साने गुरूजी

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

मी 'श्यामची आई' हे पुस्तक वाचले. या पुस्तकाचे मुखपृष्ठ खुप सुंदर आहे. या पुस्तकात एकूण ४२ रात्री आहे. प्रत्येक रात्र आपल्याला नवा संदेश देते. श्यामची आई हे सानेगुरूजी यांची आत्मकथा आहे. या पुस्तकातून आपल्याला घरची परिस्थीती गरिबीची असूनही आई आपल्या मुलावर चांगले संस्कार करते. हे समजते. एक आदर्श, होतकरू आणि प्रेमळ आई येथे सापडेल. श्यामची आई हे लोकप्रिय पुस्तक असून ते आपल्याला खूप प्रेरणा देते मला हे पुस्तक खूप- खूप आवडले.

**Recommendation (would you recommend this book ?**

**Why?)**शिफारसी (तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

होय. मी हे पुस्तक वाचायला मैत्रिणींना सांगेल कारण या पुस्तकांमध्ये मुलांवर संस्कार असे असावे हे सांगितले आहे.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 16-01-2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) वैष्णवी रविंद्र वाघ.

Tittle (शीषर्क) फकिरा

Author (लेखक) अण्णाभाऊ साठे

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

फकिरा ही कादंबरी अण्णाभाऊ साठे यांनी लिहीली आहे. या कादंबरीत फकिरा नावाच्या तरुणाचे कथानक आहे. फकिरा ब्रिटिश सत्तेला आव्हान देतो आणि शोषणमुक्तीसाठी संघर्ष करतो. या कादंबरीतून फकिराच्या विचारांना आणि त्याच्या लढ्याला जगासमोर आणण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे. फकिरा फरारी होतो आणि जंगलात आश्रय घेतो. बाबरखान फकिराला अटक करण्याचा प्रयत्न करतो, पण फकिरा हाणून पाडतो. ब्रिटिश सरकार फकिरांच्या नातेवाईकांना अटक करते आणि त्यांचा छळ करते. आपल्या आपल्या नातेवाईकांचा छळ सहन न होऊन फकिरा शरण घेतो. नंतर ब्रिटिश सरकार फकिरांना फासावर चढवते.

**Recommendation (would you recommend this book ?**

**Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

मी ही कादंबरी माझ्या मित्र मैत्रीनींना वाचायला सांगेल कारण फकिरा याने ब्रिटिशांच्या विरोधात शोषणमुक्तीचा संघर्ष करतो.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 16-1-2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) वैष्णवी चिंतामन तुरारे

Tittle (शीर्षक) छावा

Author (लेखक) शिवाजी सावंत

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

पुस्तक वाचल्यावर संभाजी महाराजांची ओळख अनेक रूपातून झाली. युवराज, एक शूर लढवय्या, कोणत्याही प्रसंगी माघार न घेता लढणारा वीर, धोरणी राजकारणी, प्रजाहितदक्ष राजा, तरल संवेदना जाणून त्या शब्दबद्ध करणारा कवी, कर्तव्यनिष्ठ पुत्र, प्रेमळ भाऊ नि आदर्श पती. पण या सर्वातही त्यांची खरी ओळख मला पटली तो माणूस म्हणून. मराठा साम्राज्याचे राजे असूनही त्यांनी गरिब जनतेवर कधी अन्याय होवू दिला नाही. संभाजीराजांची हीच शिकवण मला या पुस्तकातून मिळाली. आयुष्यात स्वतःहून घेतलेल्या कोणत्याही निर्णयावर आपल्याला ठाम राहता आलं पाहिजे.

**Recommendation (would you recommend this book ? Why?)** शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

होय .. कारण छ. संभाजी महाराजांचे कार्य त्यांचे स्वराज्याप्रती प्रेम हे जगाला माहित होण्यासाठी मी या ग्रंथ सगळ्यांना वाचण्यासाठी सांगेल.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 16 - 1 - 2024

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव ) वैष्णवी विठ्ठल आत्राम

Tittle (शीर्षक) सोनसाखळी

Author (लेखक) साने गुरुजी

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश )

"सोनसाखळी" ही साने गुरुजींची एक सुंदर कथासंग्रहाची रचना आहे, जिथे स्नेह, माणुसकी, आणि संवेदनशीलता यांचे दर्शन घडते. या कथामधून साने गुरुजींनी साध्या पण हृदयस्पर्शी प्रसंगांद्वारे जीवनातील महत्त्वाच्या मूल्यावर प्रकाश टाकला आहे. सोनसाखळी कथेत एका लहान मुलीच्या आणि तिच्या वडिलांच्या गोड संवाद आहे. या कथेत मुख्य गाभा म्हणजे माणसातील निसर्गाशी असलेले नाते. कथेतील मुलगी अत्यंत निरागस असून तिला एका फळाचे आकर्षण आहे. त्या फळाची तुलना लेखकाने सोन्यासारखी केली आहे.

**Recommendation (would you recommend this book ?**

**Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

मि माझ्या मैत्रिणीला हे पुस्तक वाचायला सांगेल कारण या पुस्तकामध्ये मुलीच्या व तिच्या वडिलांचे प्रेम कसे असायला पाहिजे व जिव्हाळा कसा असतो हे त्या पुस्तकातून शिकण्यासारखे आहे. म्हणुन मि तिला हे पुस्तक वाचायला सांगेल.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 16 / 01 / 2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) सानिया गजानन सलाम

Tittle (शीर्षक) स्वामी विवेकानंदांची भारतयात्रा

Author (लेखक) सुनिल चिंचोलकर (1951 - 2018)

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

स्वामी विवेकानंदांनी भारतयात्रा केली. ज्या देशाची आपल्याला सेवा करायची आहे, ज्या समाजाची आपल्याला सेवा करायची आहे, तो देश, तो समाज स्वतः डोळ्यांखालून घालावा. म्हणून स्वामी विवेकानंदांनी हिमालयापासून कन्याकुमारी पर्यंत भ्रमण केले. स्वामी विवेकानंदांनी अनेक ग्रंथांचे खंडच्या खंड वाचत असत. स्वामी विवेकानंदांच्या मनात आले, की आपली भारतयात्रा आता संपत आहे. आपण देशाच्या टोकापर्यंत आलेलो आहोत; पण जिथे आपण उभे आहोत, ते देशाचे टोक नाही. तो शिलाखंड हे देशाचे टोक आहे. त्या शिलाखंडावर आपण जावे. कन्याकुमारीच्या परती भारतयात्रा समाप्त केली.

**Recommendation (would you recommend this book ?**

**Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

कुठलीही गोष्ट ही झटपट / लगेचच होत नाही त्या करिता परिश्रम घ्यावेच लागतात. असा, श्रम हा सूर्यासारखा ~~सूर्यासारखा~~ सर्वप्रकाशक असतो वसुंधरेसारखा सर्वसंग्राहक असतो. हा ग्रंथ प्रत्येक युवकांनी वाचन केले पाहिजे जेणेकरुन जिवनाला प्रेरणा मिळेल.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 16/1/2024

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) तनु शरद गेडाम.

Tittle (शीर्षक) उचल्या

Author (लेखक) लक्ष्मण गायकवाड

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

'उचल्या' मुळे जितके आनंदाचे दिवस पाहिले तेवढेच दुःखाचे दिवस पण मला पहावयास मिळाले. काही लोकांना माझ्या मोठे-पणामुळे जेवढे चांगले वाटले तेवढेच काहींना वाईटसुद्धा वाटले.

'उचल्या' मुळे विमुक्त भटक्या समाजाच्या समस्येला, त्यांच्या अन्याय, अत्याचाराला वाचा फोडण्याचे काम मोठ्या प्रमाणात झाले. 'उचल्या'चे इंग्रजी, हिंदी, कन्नड, गुजराती, तेलगू, उर्दू भाषिकांना तर माझे अनुवादित पुस्तक वाचून 'डिनोटिफाइड ट्राइब्ज' जमातीच्या व्यथा प्रथमच कळल्या. यामुळे भारतातल्या अनेक विद्यापीठांना पुस्तके तर लागलीच; पण काहींना तर 'उचल्या'चे मोठ्याप्रमाणावर पीएच.डी. करून डॉक्टरेटही मिळवली. 'उचल्या'चे देशातील विविध भाषांत अनुवाद झाले आणि त्या-त्या भाषेमधील वेगवेगळ्या प्रांतातील हजारो वाचक आज माझ्यावर भरभरून प्रेम करत आहे.

**Recommendation (would you recommend this book ? Why?)**शिफारसी (तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

लक्ष्मण गायकवाड यांनी उचल्या पुस्तकांच्या माध्यमातुन सुख-दुःख विद्यार्थ्यांपर्यंत अनुभव पोहचवण्याचा प्रयत्न त्यांनी केली. मी हे दुसऱ्यांना वाचायला सांगेल.

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 15/01/2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) निकिता प्रभाकर पोटे

Tittle (शीर्षक) – मृत्युंजय

Author (लेखक) – शिवाजी सावंत

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश)

जगाच्या पाठीवर अन्याय, वेदना, परिश्रम नावाची गोष्ट मुळात काय असते. हे ह्या कादंबरी मधून आपल्याला शिकायला मिळते. ह्या पुस्तकामध्ये महाभारत आणि त्यातील महत्त्वपूर्ण योद्धा तो म्हणजे कर्ण यांच्याविषयी सविस्तर लेखन केलेले आहे.

माणूस म्हणून जगात प्रसंगांना नागाने कसे जगावे, मैत्री, किंवा इतर नाते कसे जपावेत हे सर्व कर्णाच्या जगण्यावरून आपल्याला समजते. आयुष्याच्या शेवटपर्यंत स्वतःच्या चांगल्या तत्त्वांशी कसे प्रामाणिक राहावे व ते तत्त्व मुळात कृतीत कसे उतरावे हे सुद्धा ह्या कादंबरी मध्ये आपल्याला शिकायला मिळते. दुःख वाटत जाते खरंतर हे कर्ण या योद्ध्याकडून शिकण्यासारखे आहे.

**Recommendation (would you recommend this book ? Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

हो! मित्राला, कारण दुःख कितीही जरी असले तरी त्यावर निराश न होता सातत्याने लढत राहणे हे आपल्याला इथून शिकायला मिळते.

**BOOK REVIEW**

**ग्रंथ पुनरावलोकन**

Date (दिनांक) 16/01/2025

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) करण विठ्ठल सरपाते

Tittle (शीर्षक) कलेक्टर साहिबा

Author (लेखक) कैलाश मांजु बिश्नोई

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश )

कलेक्टर साहिबा ही कादंबरी काल्पनिक असली तरी देशपातळीवर स्पर्धा परिक्षा देणाऱ्या विद्यार्थ्यांना कोणकोणत्या आव्हानांना सामोरे जावे लागते याचे वास्तव चित्रण करते. आजच्या आधुनिक जगामध्ये स्पर्धा परिक्षा खुप मोठी स्पर्धा बनली आहे. कलेक्टर साहिबा या कादंबरी मधुन जो विद्यार्थी स्पर्धा परिक्षेची तयारी करीत आहे त्या विद्यार्थ्यांसाठी त्यांचे स्वप्न पुर्ण करण्यास त्यांना मदत होईल. IAS होण्याचा प्रवास दिर्घकाळ चालु राहणार असतो जे विद्यार्थी मोठे स्वप्न पाहणाऱ्या आणि समाज व आसपासच्यांचे टोमणे ऐकुन घेऊनसुद्धा आपल्या ध्येयाप्रति लक्ष केंद्रित करते. या कादंबरी मधुन मुलामुलींना ध्येय प्राप्त करण्यासाठी चांगले मार्गदर्शन मिळते.

**Recommendation (would you recommend this book ?**

**Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

कारण कलेक्टर साहिबा ही कादंबरी मधुन स्पर्धा परिक्षा मध्ये आत्मविश्वास वाढविण्यासाठी खुप चांगली आहे कलेक्टर साहिबा ही कादंबरी खुप छान आहे म्हणून मी माझ्या मित्रांना वाचन करण्यास सांगतो .

**BOOK REVIEW**

ग्रंथ पुनरावलोकन

Date (दिनांक) 16-1-25

Name of Reviwer (समीक्षकाचे नाव) पायल सतिश खोडे

Tittle (शीर्षक) ग्रामगीता

Author (लेखक) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज

A Brief Synopsis (थोडक्यात सारांश )

ग्रामगीता हा राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांनी लिहिलेला काव्यग्रंथ आहे. या ग्रंथातून ग्राम विकासाच्या महत्वावर प्रकाश टाकण्यात आला आहे. ग्रामगीता हा ग्रंथ ग्रामीण समाजाच्या विकासासाठी एक आदर्श संदर्भ आहे. ग्रामगीता हा ग्रंथ कोणत्याही एका विशिष्ट देव, धर्म, पंथ वा जाति-जमातीचा नसून तो अखिल मानवजातीच्या उद्धाराचा सुबोध आहे. ग्रामगीतातून ग्राम विकासाचा उत्कृष्ट दाखला मांडला आहे. ग्रामगीतातून ग्रामीण समाजाच्या विकासासाठी महत्वाचे विचार मांडले आहेत व्यक्ती विकासाचा ग्राम विकासाच्या महत्वाचा उल्लेख केला आहे.

**Recommendation (would you recommend this book ?**

**Why?)**शिफारसी ( तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला ? का?

तुकडोजी महाराजांनी आपल्याला ग्रंथातून आपला गाव आदर्श गाव बनवा असे सांगितले आहे.

www.youvaworld.com

Date : Page :

Topic :

Name ⇒ Sudarshan Bharat Bokade

Class ⇒ M.A 2nd Year IIIrd Sem

College Name ⇒ छत्रपती शिवाजी महाराज प्रशासकीय महाविद्यालय, वरोरा

Essay Topic ⇒ "वाचन संस्कृती"

Date : Page :
Topic :

# " वाचन संस्कृती "

वाचन संस्कृती म्हणजे पुस्तके वाचण्याची सवय आणि ती जोपासण्याची परंपरा. वाचन हा केवळ ज्ञान मिळवण्याचा मार्ग नसून तो व्यक्तिमत्व विकासाचा आणि विचारांशी दिशा ठरवणारा महत्त्वाचा घटक आहे.

प्राचीन काळात वाचनाला खूप महत्त्व होते. वेद, उपनिषदे, महाकाव्ये यांचा अभ्यास करणे हे ज्ञानार्जनाची प्रमुख साधने होती. छपाई यंत्राच्या शोधानंतर पुस्तकांची निर्मिती अधिक झाली, त्यामुळे वाचन सर्वसामान्यांपर्यंत पोहोचले. आजच्या तंत्रज्ञानाच्या युगात डिजीटल माध्यमांद्वारे वाचन सुलभ झाले आहे, मात्र त्याचबरोबर त्यावर ताणही वाढला आहे. स्मार्टफोन, टि.व्ही, सोशल मीडिया यामुळे अनेक लोक वाचनाकडे दुर्लक्ष करतात.

तरिही वाचन संस्कृतीचे महत्त्व आजही कायम आहे. वाचनामुळे ज्ञानात वाढ होते, विचारप्रक्रिया सृजनशील बनते आणि मानवी मन समृद्ध होते. विशेषतः लहान वयातच गोडी लावली तर व्यक्तिमत्वाच्या जडणघडणीत मोठी मदत होते.

शाळा, ग्रंथालये आणि घरातील वाचनप्रेमी वातावरण यामुळे वाचन संस्कृती अधिक बहरते. "वाचाल तर वाचाल" ही म्हण आपण सर्वजण ऐकली आहे. वाचनामुळे केवळ आपले व्यक्तिमत्व सुधारत नाही तर समाजातले सुसंस्कृत विचारांचा प्रसार होतो. चांगल्या पुस्तकांची निवड, त्यातून मिळणारे ज्ञान आणि वाचनाची सवय ही वाचन संस्कृती टिकवून ठेवण्यासाठी महत्त्वाची आहे.

वाचन हे ज्ञानाचा प्रकाश आणि आत्म-विकासाचा मार्ग आहे. म्हणूनच वाचन संस्कृती जोपासून ती पुढील पिढ्यांना हस्तांतरित करणे आपले कर्तव्य आहे.

शिवानी मोहुर्ले

Page No.: Date: / /

# वाचन संस्कृती

वाचन एक सवय आणि संस्कृती म्हणून जोपासणे अतिशय आवश्यक आहे. वाचनामुळे मनाला आणि अंतरदृष्टीला एक अतिशय वेगळ्या प्रकारचा व्यायाम घडतो. दृक - श्राव्य माध्यमांमधून सुद्धा बरेच काही शिकायला मिळते आणि त्याच्या परीने ती प्रभावी सुद्धा आहेत परंतु वाचनात अधिक क्लिष्टता आणि गहनता आहे.

बहुतेक लोक आज जे काही करत आहेत, त्याऐवजी जर त्यांनी अधिक वाचन केले, जर ते एके ठिकाणी बसले आणि लक्ष केंद्रीत करून वाचन केले, तर ते अधिक शांत, अधिक विवेकी बनतील आणि जीवनाकडे अधिक सखोलपणे पाहतील. कारण वाचन ही एक प्रकारची ध्यान धारणा आहे.

एखाद्या गोष्टीवर लक्ष केंद्रीत करतात त्याला ध्यान- धारणा म्हणतात. ही एक प्रकारची साधना आहे कारण मन ज्या प्रकारे कार्य करते, त्यात निश्चितपणे सुधारणा होते.

पुस्तके म्हणजे ज्ञान भंडार. पुस्तकाच्या माध्यमातून आपण जीवनाचे धडे अवगत करून घेऊ शकतो. प्रेम, भीती, राग, द्वेष या सगळ्या भावनामध्ये जगण्याची कला पुस्तक देऊन जातात.

आपल्या स्वभावतालच्या जगाचे प्रवेशद्वार म्हणूनही आपण पुस्तकाकडे बघु शकतो. बाह्य जगाचे ज्ञान हे पुस्तकाच्या माध्यमातून घेतले जाऊ शकते. जीवनातील अपयशांवर मात करण्यास तसेच मनाला आकार देण्यास पुस्तक अविभाज्य घटका सारखे वापरू शकतो. कुठलीही महान व्यक्ती ही वाचनामुळेच महान बनु शकते.

एकदा वाचनाची आवड निर्माण झाली की आपोआपच पूर्ण आयुष्यभर वाचनाशी मैत्री होते. भारतातील शिक्षण क्षेत्र, सरकारी क्षेत्र, उद्योगी क्षेत्र अशी सर्वच क्षेत्रे हुशार व्यक्तीसाठी आहेत. त्यातील गुढ ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी वाचनाची गोडी आवश्यक आहे. चांगले भविष्य घडवण्या साठी आणि उज्ज्वल किर्ती मिळवण्यासाठी वाचन आवश्यक आहे.

आयुष्यातील वेगवेगळ्या दिशांना स्पर्श करण्याचे सामर्थ्य वाचनातून प्राप्त होते. बुद्धीची आणि तर्कदृष्टीची धार वाढवण्यासाठी वाचन आवश्यक आहे. वाचनामुळे व्यक्तीला पर्यायाने कुटुंबाला, समाजाला एक नवीन विकासाची दृष्टी प्राप्त होते.

Page No.: ____
Date: / /

Name :- Vaishnavi Chintaman Turare

~~College :- B.A.C.~~

College :- C.S.M. Warora

class :- B.A.C.S 1st year

# वाचन संस्कृती

"वाचनातून घडते विचार मंथन,
वाचनातूनच फुलते संस्कृती आणि जीवन!"

अन्न, वस्त्र, निवारा या माणसाच्या मुलभूत गरजा आहेत तसेच वाचन ही प्रत्येक संवेदनशील, आर्त मनाची 'आस' आहे

जीवन खऱ्या अर्थाने सुंदर, आशय संपन्न होते ते पुस्तक वाचनातूनच!

वाचन संस्कृती वाढविणे हा वाचनालयाचा उद्देश आहे. पुस्तकामुळे कमकुवत मनाला सकारात्मकपणाचा धीर मिळत असतो. तरूण पिढींना खूप ताण पडत असतो. हा ताण पुस्तकांच्या वाचनामुळे निश्चितच कमी होऊ शकतो! वाचन केल्यानेच पुढील पिढीची वैचारिक पातळी वाढू शकते. समृद्ध विचारांचा आपल्या जीवनावर नेहमीच सकारात्मक परिणाम होत असतो.

"वाचेल तो वाचेल"! हे जरी खरं असलं तरिही वाचन जेवढे आवश्यक आहे तसेच काय वाचतो हे सुद्धा महत्वाचे आहे. मनाला संवेदनशील बनवणारी आणि वैचारिक पातळी वाढवणारी पुस्तके वाचण्याची आजही काळाची गरज आहे! बालकांमध्ये आणि तरूणांमध्ये वाचनाची आवड निर्माण करायची असेल तर ग्रंथालये निर्माण करणे आवश्यक आहे. पुस्तकांमुळे आयुष्याकडे बघण्याचा आपला दृष्टिकोन बदलतो. पुस्तकांनी केवळ शब्दसंपदाच नाही तर विचार समृद्ध होतात.

Page No.: ______
Date: / /

वाचनामुळे कुठल्याही विषयावर आपली मतं बनतात आणि जगाकडे बघण्याचा दृष्टिकोन देखील बदलतो.

आज वाचनासाठी अनेक साधने, सुविधा उपलब्ध असूनही आजची तरुणपिढी मात्र यापासून दूर जात आहे.

कारण ती मोबाईल आणि इंटरनेटच्या जाळ्यात अडकलेली आपणास पहावयास मिळते. यामुळे वाचनसंस्कृती दिवसेंदिवस नष्ट होत चाललेली आहे. असं चित्र निर्माण होत आहे. म्हणूनच बालक व तरुणांमध्ये वाचनाची आवड निर्माण व्हावी यासाठी ग्रंथालयांच्या माध्यमातून विविध उपक्रम राबविण्यासाठी गरज समाजामध्ये निर्माण झालेली आहे. पुस्तकाचे वाचन करावं तेवढेच वैचारिक पातळीवरील अभ्यासाचे वाचन वाढत जाईल.

कुठल्याही विषयासंदर्भात सखोल विचार करायचा असेल तर त्यासाठी वाचन आवश्यक आहे. ज्ञानात सतत भर घालण्यासाठी वाचन हे महत्त्वाचे आहे. वाचनाने विचार विकसित होतात आणि बुद्धीची मशागत होऊन त्यामुळे जीवन फुलत जाते. यासाठी पूर्वीही होते आणि आजही वाचनाचे एकमेव ठिकाण म्हणजे वाचनालय! आज त्याची जागा इंटरनेट आणि ई-बुकने घेतलेली असली तरीही मनाचा विरंगुळा आणि मानसिक आनंद हा स्वत: हातात पुस्तक घेऊन वाचण्यानेच मिळत असतो.

ग्रंथालये ही आपल्या मनाला विविध विषयांच
अभ्यास करावयास लावणारी विद्यापीठे
आहेत असं म्हटलं तर ते वावगे ठरणार नाही
या साठी पालकांनी आपल्या पाल्यास तसेच
तरुण आणि जेष्ठ नागरिकांनी वाचन
संस्कृती वाढविण्यासाठी योग्य साथ द्यावी
यासाठी ग्रंथालये नाही ग्रंथच आपण घेण्यास
ही वाट पहात आहेत. मग आपण पुस्तकांचे
मित्र होणार ना !

/

नाव:- ज्ञान्वल वासुदेव लुशारे

छत्रपती शिवाजी महाराज महाविद्यालय
वरोरा.

B.A.C.S 1st Year

PAGE NO.:
DATE: / /

# वाचन संस्कृती

आजकाल पाहिलं तर वाचन संस्कृती लोप पावत चाललेली दिसत आहे. वाचनाचा अर्थच मुळात लोकांच्या मनातून अदृश्य होत चाललेला आहे. सगळी लहानसान मंडळी ही मुळात वाचन करायला तयार नाहीत. त्या मंडळींकडे पाहिलं तर असं वाटायला लागतं की खरंच जग कुठे चाललेले आहे.

वाचन करायचं झाल्यास ते कागदावरूनच व्हायला हवं. त्याचे बरेच फायदे आहेत. चांगलं वाचन हे कागदावरूनच होतं असं नाही. परंतु फायद्याचा विचार केल्यास चांगलं वाचन करण्यासाठी कागद हाच महत्त्वाचा घटक आहे. कागदावर वाचन केल्यानं पाहिजे त्या प्रमाणात डोळ्यांना हानि पोहोचत नाही.

वाचनाचा मुळात अर्थ होतो, तो म्हणजे कोणत्याही भाषेतील लिखील मजकूराला समजणे, वाचनाचे मुख्य दोन प्रकार आहेत. पहिला म्हणजे सुस्वर वाचन याला प्रकटवाचन -नही म्हणतात. दुसरा आहे मौन वाचन मनातल्या मनात वाचणे. प्रकटवाचन म्हणजे तोंडाने आवाज करीत वाचणे तसेच मौन वाचन म्हणजे तोंडाने आवाज न करता वाचणे होय.

मुळात वाचन ही एक कला आहे
पूर्वीही वाचनाला महत्त्व होते हे वाचन
ताम्रपत्रातून तसेच झाडाच्या सालीतून
तसेच पानाद्वारे केला जातो. ह्याचे
पुरावे मोहेंजोदडो व हडप्पाच्या
उत्खननात मिळाले. तसेच मोहेंजोदडो
व हडप्पाच्या संस्कृतीने भांड्यावर
केलेली कला हेही त्या काळात वाचन
उपलब्ध होते हे केवळ मोहेंजोदडो
किंवा आजिंठा वेरूळच्याच लेणीवरून
येत नाही.

इतरही देशातील संस्कृतीच्या
उत्खननातून दिसून येते. त्यात मेसोपोटेमिया
बॅबीलोनीयन, ग्रीक व रोमन यांचाही
समावेश होतो. टिग्रीस आणि युफ्रेटिस
नदीच्या किनाऱ्यावर झालेल्या उत्खनन
मिळेच काही अवशेष सापडले आहेत.
त्यावरून त्या काळात वाचन संस्कृती
अस्तित्वात होती.

आज वाचन संस्कृती
लयास गेल्यास परिणाम असा होईल. आहे
की संपूर्ण पिढी बरबाद होईल. वाचन
न केल्याने लोकांमध्ये अज्ञानता पसरते
आहे. लोकं खरं ज्ञान मिळविण्याऐवजी
व बोलतेन वागण्याऐवजी उगाच
मोबाइल व वाहिन्याने डोक्याची
माहिती पाठी करतात.

चांगल्या गुणांच्या आपल्या मनात भरणा करायला हवा. मोबाईलवर वाचण करण्यापेक्षा कागदावरच वाचन व्हायला हव. कथा- कादंबऱ्या वाचायला हव्या तसेच लेखकांनीही चांगल्या पुस्तकांनिर्माण करायला हव्यात बिभत्स स्वरूपाची दृश्ये दाखवू नयेत.

पुस्तकातील चांगल्या गोष्टी वाचन करणे शिकवावे जेणेकरून विद्यार्थ्यात डोळ्यांचे आजार निर्माण होणार नाही तसेच चांगल्या मुल्यांची लहान मुल्यात लहान पणापासूनच रूजवणूक होईल तसेच त्याला आपल्या मनात चांगल्या गोष्टीची जाणवणूक करता येईल.

त्यासाठी घरी चांगली पुस्तके ठेवणे गरजेचे आहे. लहान मुलांना गोष्टी जास्त आवडतात तेव्हा ही वाचनाची सवय लागावी म्हणून प्रत्येक घरी एक तरी गोष्टीची गोष्टीच पुस्तक असावं जेणेकरून केव्हाही आणि कधीही वाचन करता येईल हे येवढेच खरं आहे.

Page No.
Date / /

नाव : वैष्णवी रविंद्र वाघ

छत्रपती शिवाजी महाराज
महाविद्यालय वरोरा

वर्ग : First Years

विषय : वाचन संस्कृती

Page No.
Date / /

निबंध

✱ व्याकरणाची सुरुवात ✱

## वाचन संस्कृती

वाचन का करावं? हा प्रश्न प्रत्येकालाच पडत असेल पण याचे उत्तर कोणाला मिळलं कि नाही माहित नाही. पण महात्मा फुले हे थोर क्रांतीकार झाले याला कारणीभूत एकमेव गोष्ट म्हणजे थॉमस पेन यांनी लिहिलेले "राईट्स ऑफ मॅन" नावाचे पुस्तक. या पुस्तकातुन महात्मा फुले यांना प्रेरणा मिळाली. डॉ बाबासाहेब आंबेडकर हे विश्वरत्न झाले. याचे मूळ हे केळुसकर गुरुजी यांनी बाबासाहेबांना लहानपणीच भेट दिलेले बुद्ध चरित हे पुस्तक आहे. भगत सिंग यांनी फाशीची शिक्षा सुनावण्यात आली. सकाळी फाशी देणार तर आदल्या रात्री भगत सिंग हे एक पुस्तक वाचत होते. त्यावेळी तेथील जेलरने भगतसिंग यांना विचारले तुला तर उद्याला फाशी देणार आहे. मग या पुस्तक वाचण्यात काय उपयोग आहे. तेव्हा भगत सिंग यांनी जेलरला सांगितले की माझ्या वाचण्यातून अनेक भगतसिंग जन्माला येतील म्हणून मी पुस्तक वाचत आहे. भगत सिंग यांनी तुरुंगात असताना पुस्तक वाचायला मिळाले पाहिजे म्हणून अन्नत्याग करून पुस्तक वाचण्याची सोय व उपलब्ध करून घेतली होती. वाचन हा शब्द कसा

Page No.
Date / /

तयार झाला. आपल्यासाठी तो का उपयुक्त आहे. वचन या शब्दातून वाचन हा शब्द तयार झाला आहे. वचन म्हणजे शपथ एखादे काम पूर्ण करण्यासाठी किंवा त्या मार्गावर चालण्यासाठी केलेला निर्धार म्हणजे शपथ. श म्हणजे शतक शंभर टक्के व पथ म्हणजे मार्ग किंवा रस्ता म्हणजे शंभर टक्के यशाकडे जाणारा शब्द म्हणजे वाचन. वचन चा अर्थ आहे शपथ. शपथ याचा अर्थ आहे यशस्वी मार्ग यावरून वाचन म्हणजे शंभर टक्के यशस्वी होण्यासाठी पुस्तक वाचल पाहिजे

"वाचनातून घडते विचार मंथन,
वाचनातूनच फुलते संस्कृती आणि जीवन!"

अन्न, वस्त्र, निवारा या प्रमाणसाच्या मूलभूत गरजा आहेत. तसेच 'वाचन' ही प्रत्येक संवेदनशील, आर्त मनाची आस आहे.

जीवन खऱ्या अर्थाने सुंदर, आशयसंपन्न होते ते पुस्तक वाचनातूनच आपला वेळ सत्कारणी लागतो, मनोरंजन तर होतेच पण ज्ञानप्राप्तीही होते. वर्तमानपत्र, मासिके, कथा, कादंबऱ्या, कविता मानवीमनाचा वेध घेतात. वाचनातून शब्दसंपत्ती वाढते बुद्धील चालना मिळते आणि स्मरणशक्ती वाढते.

वैचारिक लेख वाचतांना आपण अंतर्मुख होतो, आपण, चांगले काय? वाईट काय? याचा विचार करतो त्यातून आपली विवेक बुद्धी निरिक्षण शक्ती आणि संवेदनशीलता वाढते.

चांगली प्रेरणादायक पुस्तके समाजात विवेक दिपस्तंभाचे कार्य करतात. समाजात क्रांती घडवतात समाजाला सुयोग्य दिशा दाखवतात, समाजमनात आशावाद निर्माण करतात. डॉ. ए. पी. जे. कलाम यांचे अग्नीपंख हे पुस्तक किरन बेदींचे आय डेयर हे पुस्तक आपल्याला संघर्ष नी अपयशाचा सामना करत सतत प्रयत्नशील कसे राहावे हे शिकवतात. एक होता कार्व्हर, श्रीमान योगी मृत्युंजय 'छावा' आणि 'वल्ली' अशी अनेक पुस्तके आपल्या मनाची मशागत करतात. नकारात्मकता ताण तसेच नैराश्य याचा निचरा होतो. मनात सकारात्मक वृत्ती विकसित होते. मनात भावभावनांचे तरंग उमटतात, विचारांची आंदोलने घडवतात. परंतु, चांगले साहित्य निवडणे आपल्या हातात आहे.

चांगल्या साहित्याचे, चांगल्या विचारांचे वाचन व त्याचा प्रचार, प्रसार करणे सुशिक्षीत सुसंस्कृत समाजमनाचे सदृढ आणि सशक्त समाजाचे उत्तम लक्षण आहे. चांगल्या पुस्तकाच्या वाचनातून ~~निर्मित~~ नितीमुल्यांची जसे आदर, कृतज्ञता सहकार्य

Page No.______
Date ___/___/___

संची जोपासना होते. म्हणूनच लहान मुलांचे मन जेव्हा कोवळे संवेदनशील, निरागस असते, त्याच वेळी पालक व शिक्षकांनी पुस्तक वाचनाची गोडी विकसित करणे आवश्यक आहे. आजही असंख्य मुले "श्यामची आई", इसापनीती, फास्टर फेणे, चिंटू आवडून वाचतात. कारण वाचन संस्कार ही काळाची गरज आहे.

आजच्या आजच्या तंत्रज्ञानाच्या सुवेगवान युगातही फेसबुक, व्हॉट्सअ‍ॅप, युट्युब, माध्यमातून वैचारिक लेख कथा कवितांचे आदानप्रदान होते. ई. बुक्स, ए. जर्नल्स, पी.डी.एफ या नव्या स्वरूपातही वाचन चळवळ सुरू आहे आणि पुढेही सुरू राहील.

आपण डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम यांचा जन्मदिवस वाचन 'प्रेरणादिन' म्हणून उत्साहाने आनंदाने साजरा करतो. या दिवशी शाळा महाविद्यालयात निबंध लेखन स्पर्धा, पाठांतर स्पर्धा होतात. वक्तृत्व आणि काव्य स्पर्धा होते. वाचन संस्कृतीला, वाचन चळवळीला प्रेरणा मिळते. मुलांना ग्रंथप्रदर्शन वाचनालय, अभिवाचन कथा कथन कार्यक्रम, नाट्यशिबिरे यांची ओळख आवड निर्माण करणे ही पालक शिक्षकांची जबाबदारी आहे. कारण वाचन संस्कारातूनच मुले व्यसने, घातक संगणक खेळ वाईट संगत यातून स्वतः बाहेर पडतील त्यांचा व्यक्तीमत्व विकास होईल आणि भारताचे भावी सुजान सुसंस्कृत

नागरीक म्हणुन हीच मुले मातृभुमिला बलशाली, प्रगतीशील करू शकतील.

कारण वाचन संस्कारातून 'वाचाल तर वाचाल!' असे का म्हणतात? हे ते स्वतः आत्मसात करतील आणि,

" वाचे बरवे कवित्व।
कवित्वि रसिकत्व।
रसिकत्वी परतत्वा
स्पर्श जैसा।"

असे ज्ञानेश्वर माऊलींचे म्हणने आहे.

Page No.
Date

नाव - वैष्णवी विठ्ठल आत्राम

विषय - वाचन संस्कृती
B.A.C.S 1st YR.
विद्यालय - छत्रपती शिवाजी महाराज, महाविद्यालय वरोरा

## वाचन संस्कृती

वाचन संस्कृती म्हणजे लिखीत शब्दांच्या माध्यमातून ज्ञान, माहिती आणि मनोरंजन मिळवण्याची सराव. वाचन संस्कृती वाढवणे हा वाचनालयाचा उद्देश असतो. वाचन संस्कृतीबद्दल मराठीत निबंध लिहिताना खालील गोष्टींचा विचार करता येईल:

- वाचन संस्कृती वाढवणे हा वाचनालयांचा उद्देश आहे.
- वाचन केल्याने माणूस मोठा होतो.
- पुस्तकांचे वाचन केल्याने ज्ञान वाढत जाते.
- वाचन केल्याने कमकुवत मनाला सकारात्मकपणाचा धीर मिळतो.

Page No.
Date

- तरुणांमध्ये वाचन वेड उत्पन्न करण्यासाठी त्यांच्याभोवती तशी परिस्थिती निर्माण करणे गरजेचे आहे.

- संस्कारांतूनच संस्कृती निर्माण होते.

- वाचन संस्कृती ही जगातली श्रेष्ठ संस्कृती आहे.

सध्याची अवस्था तर एक प्रकारची कुंठावस्था आहे. असे मला वाटते. लहानपणी जुन्या पिढीत मुलांच्या हातात जनापमीती साने गुरुजींच्या संस्कारक्षम गोड गोष्टी 'श्यामची आई' या सारखी पुस्तके असायची. आताची मुळे सलग पानभर नाही लिहिलेले असेल तर ते सुध्दा वाचायची तसदी घेत नाही. चिंगल्या मार्फत २-२ ओळींची माहिती संकलित केलेली कुट्टून्स त्यांना जास्त आवडतात. दीर्घ कथा, लघु कादंबरी, मोठी वैचारिक पुस्तके, सुंदर कवितांचा संग्रह या गोष्टी तर त्यांच्या आजुबाजुला फिरकत सुध्दा नाही.

अलीकडे हा वाचन संस्कारच घराघरातून हरवला आहे. अगदी बालवर्गापासून परिक्षा आणि त्यात मिळणारी टक्केवारी यालाच अनन्य साधारण महत्व प्राप्त झाले आहे. त्यामुळे पाठ्यपुस्तकाव्यतिरिक्त अन्य वाचन करण्याची विदयार्थ्यांची प्रवृत्तीच नष्ट झाली आहे.

पालकही याबाबत उदासिन असे आहेत;

वाचन समृद्ध असले म्हणजे लेखनाचीही प्रवृत्ती प्रबळ होते. कल्पनाशक्तीला वाव मिळतो, रसिकता वाढीस लागते सृजनशीलतेला वाट सापडते, सहृदयता, दुसऱ्याच्या दुःखाची जाणीव, त्यांस आवश्यक असणारे संवेदनशील मन यांस खतपाणी मिळते. खऱ्या अर्थाने माणुसकीचे मुल्य अंगी बाणते. सामाजिक जाणिव दृढ होते. इतरांबाबत, समाजाबाबत, आपली काही कर्तव्ये आहेत याचे भान प्राप्त होते. माता, पिता, शेजारी, समाज आणि राष्ट्रापर्यंत आपली काही बांधिलकी आहे याची जाणिव जागृत राहते. मन संकुचित, क्षुद्र रोष्ठीत अडकत नाही. ते विश्वात्मक होते. वाचनामुळे माणसाला, माणूस म्हणून असलेल्या अस्तित्वाचे मोल किती अनमोल आहे याचे भान प्राप्त होते.

आजच्या मनुष्याच्या ठिकाणी असणारे ज्ञान ही त्याची फार मोठी शक्ती आहे. या शक्तीच्या सहाय्याने तो सुबुद्ध आणि प्रगल्भ तर होतोच; परंतु त्याच्या कार्यसंस्कृतीवर सुद्धा त्याचा प्रभाव पडतो. मागल्या पिढीपेक्षा आताच्या

पिढीचे वाचन अगदी अल्प झाले आहे अशी तक्रार सर्वच थरातून वाढते आहे. वाचन संस्कृती टिकून धरण्यासाठी आणि प्रत्येक माणसाचे मन सुविचार संपन्न होण्यासाठी वाचनाची आवड मुळातूनच निर्माण होणे आवश्यक आहे.

तरुणांमध्ये वाचन वेड उत्पन्न व्हायचे असेल तर तशी परिस्थिती त्यांच्याभोवती निर्माण होणं गरजेचं आहे. वाचनाने माणूस मोठा होत असतो. पुस्तकांचे वाचन केल्याने तेवढेच ज्ञान वाढत जाईल ग्रंथ हे गुरु आहेत. जुन्या पिढीपाशी ही मोबाईल फोनवरसुद्धा विशिष्ट नंबर फिरविल्याबरोबर आजच्या बदीला जगातील कानाकोपऱ्यात घडणाऱ्या घटकांची अद्ययावत माहिती प्राप्त होते. त्यामुळे जुन्या पिढीपाशी ही अद्ययावत साधने नसल्यामुळे जास्तीत जास्त वाचनातून ते आपली ज्ञान - लालसा भागवत असत.

नाव:- आंचल अनिल घोडे

# निबंध

## वाचन संस्कृती

वाचनाने माणूस ज्ञानी होतो आणि त्याला पुस्तकाच्या रूपाने एक नवीन मित्र मिळतो. वाचन ही एक कला आहे. वाचन माणसाला माणूस बनविते जीवनाला एक नवी दिशा देते विचार करायला शिकविते. अंतर्मुख करणे त्याचप्रमाणे जीवनात योग्य - अयोग्य काय यांची जाणीव करून देते. आपल्या समाजात वाचाल तर वाचाल अशी म्हण प्रचलित आहे. वाचन ही शिकण्याची गुरुकिल्ली आहे.

हे एक कौशल्य आहे जे प्रत्येकाने त्यांच्या आयुष्यात विकसित केले पाहिजे. वाचण्याची क्षमता आपल्याला नवीन तथ्ये शोधण्यास सक्षम करते आणि कल्पना, कथा आणि संधींच्या नवीन जगाचे दरवाजे उघडते आपण आपल्या जीवनातील विविध कार्ये करण्या साठी पुरेशी माहिती गोळा करू शकतो. आणि योग्य दिशेने वापरू शकतो वाचनाची सवयही आपले ज्ञान वाढवते आणि आपल्याला अधिक बौद्धिक आणि समंजस बनवते.

वाचन हा एक उत्तम छंद आहे
विविध प्रकारची पुस्तके वाचण्यात
मजा येते. पुस्तके वाचून आपण
जगभरातील विविध क्षेत्रातील लोक, विविध
संस्कृती, परंपरा आणि बरेच काही जाणून
घेता. वेगवेगळी पुस्तके वाचून खूप काही
शिकण्यासारखे आहे ते ज्ञानाची विपुल
ता आहेत आणि मानवाचे सर्वोत्तम
मित्र आहेत. प्रत्येक क्षेत्र आणि क्षेत्राशी
संबंधित पुस्तके वाचून आपल्याला माहिती
मिळते बाजारात विविध प्रकारची पुस्तके,
काल्पनिक पुस्तके सांस्कृतिक पुस्तके

ऐतिहासिक घटना आणि
युद्धांशी संबंधित पुस्तके इ. तसेच
अनेक मासिके आणि कादंबऱ्या आहेत
ज्या लोक प्रवास करताना, कधीही
आणि कुठेही वाचू शकतात. त्यांचा
वेळ प्रभावीपणे वापरा. शिक्षणामध्ये
वाचन महत्वाची भूमिका बजावते
आणि त्याच्या विकासावर प्रभावशाली
प्रभाव पडतो. संशोधकांनी वाचन
कौशल्य विकसित करण्याचे मूल्य आणि
लहान वयातच मुलांना वाचनाचे फायदे
अधोरेखित केले आहेत.

Page No.
Date

वाचनाचे महत्त्व या निबंधाच्या मदतीने आम्ही तुम्हाला वाचनाचे महत्त्व या निबंधाच्या मदतीने आम्ही तुम्हाला वाचनाचे फायदे आणि आपल्या जीवनात शिक्षणामध्ये वाचन महत्त्वाची भूमिका बजावते आणि त्याचा शिकण्यावर प्रभावशाली प्रभाव पडतो संशोधकांनी वाचन कौशल्य विकसित करण्याचे मूल्य आणि लहान वयात च मुलांना वाचनाचे फायदे अधोरेखित केले आहेत जी मुले प्राथमिक शाळेच्या शेवटी नीट वाचू शकत नाहीत त्यांना माध्यमिक शाळेत यश मिळण्याची शक्यता कमी असते.

वाचन हे एक अपरिहार्य कौशल्य आहे हे मूलभूतपणे शिक्षण प्रक्रियेशी आणि शैक्षणिक यश मिळवणाऱ्या विद्यार्थ्यांशी संबंधित आहे वाचन विद्यार्थ्यांना शब्दांचा अर्थ शोधण्यासाठी भाषा कशी वापरायची हे शिकण्यास मदत करते हे, त्यांचे शब्दसंग्रह, माहिती प्रक्रिया कौशल्य आणि आकलन सुधारते वर्गात वाचनामुळे निर्माण झालेल्या चर्चेचा उपयोग विद्यार्थ्यांना अर्थ तयार करण्यासाठी आणि मजकुरातील कल्पना आणि अनुभव जोडण्यासाठी प्रोत्साहन करण्यासाठी केला जाऊ शकतो.

नाव :- साक्षी सुभाष पिंपळशेंडे

निबंध

# वाचन संस्कृती

वाचन हे एक ज्ञानार्जनाचे साधन आहे वाचन संस्कार आणि संस्कृती संवर्धनाच्या महत्वाचा उपाय आहे. वाचन हा मने घडविणारा सुसंस्कार आहे. वाचन ही जीवन फेर पुरणारी शिदोरी आहे.

माहिती तंत्रज्ञानाच्या युगात बालकांपासुन ते आजोबांपर्यंत सगळेच माणसे दुरदर्शनाच्या भोवती केंद्रीत झालेली दिसतात. तासन् तास टी. व्ही. समोर बसणारी माणसं स्वतःसाठी दररोज चार ओळी वाचायलाही तयार नाहीत. परिणामी अधःपतनास सुरुवात झाली आणि मग पुन्हा सांगण्याची वेळ आली. 'वाचाल तर वाचाल!'

मित्रहो. वाचन हा फक्त विरंगुळ नाही तर तो अर्थपुर्ण विरंगुळा आहे. कारण मनोरंजनाबरोबरच ज्ञानार्जनाचा प्रमुख हेतु वाचनामागे असतो. आपण खरं तर वेळ जात नाही म्हणुन वाचन करण्यापेक्षा वाचनासाठी वेळ वेळ काढला पाहीजे.

ग्रंथसार लिखाण ...



समीक्षकाचे नाव: आकाश पत्ता ठाकरे
शीर्षक नाव: संत ज्ञानेश्वरी
लेखकांचेनाव: श्री कृष्णा भगव गीता
प्रकाशन व स्थळ :-

सारांश

ज्ञानेश्वरी" हा ज्ञानेश्वरांनी रचलेला एक महत्वपूर्ण तत्वज्ञानविषयक ग्रंथ आहे. या ग्रंथामध्ये भगवान श्री कृष्णाची भगवद गीतेतील उपदेशाची मराठीत विस्तृत आणि सोपी व्याख्या केली आहे ज्ञानेश्वरीचे लिखाण भक्तिपंथाशी संबंधित असून हे ग्रंथ मानवाच्या जीवनातील तत्वज्ञान अध्यात्म आणि कर्मयोग यावर केंद्रित आहे.

ज्ञानेश्वरीत कर्म, भक्ती, ज्ञान आणि योग या चार मार्गांवर विचार केला आहे संत ज्ञानेश्वरीच्या गोड भाषेत दिलेल्या उपदेशांमुळे अनेक वाचनप्रेमींचे हृदय जागृत झाले आहे. त्यांनी भगवत गीतेतील तत्वज्ञान नवा दृष्टिकोन देऊन, तिला सहज समजण्यास योग्य बनवले आहे.

शिफारस →

ज्ञानेश्वरी या ग्रंथाची शिफारस मी त्या सर्वांना करेल, ज्यांना तत्वज्ञान अध्यात्म आणि मराठी साहित्यातील महान ग्रंथांमध्ये रुची आहे, या ग्रंथाच्या वाचनाने जीवनाच्या गहन अर्थाचे, दैवी मार्गदर्शन मिळते.

दि. 5/01/2025




ग्रंथसार लेखन स्पर्धा

समिक्षकाचे नाव :- विजय मारोती मोहिते

ग्रंथ :- दृष्टलिखित महात्मा फुले

लेखकाचे नाव :- महात्मा फुले

प्रकाशन व स्थळ :-

सारांश :-

दृष्टलिखित महात्मा फुले" हा ग्रंथ महात्मा जोतिराव फुले यांच्या जीवनकार्य आणि तत्त्वज्ञानावर आधारित आहे. महात्मा फुले हे भारतीय समाजसुधारक होते, त्यांनी अस्पृश्यता, जातिवाद आणि स्त्रीशिक्षणाच्या क्षेत्रात महत्त्वपूर्ण कार्य केले, या ग्रंथात त्यांचे कार्य, विचार आणि समाजातील अन्यायावर त्यांची संघर्षाची कथा सुस्पष्टपणे मांडली आहे.

महात्मा फुले यांनी आपल्या जीवनभर अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी आणि सर्व समाज हक्कांसाठी समाजाच्या अधिकाराची मागणी केली. त्यांच्या मुख्य उद्देश समाजातील दारिद्र्य, अशिक्षा आणि शोषणाची प्रणाली तोडणे होता.

तुम्ही वरील ग्रंथाची शिफारस कोणाला कराल का?

शिक्षक आणि शिक्षिका – महात्मा फुले यांनी शिक्षणाच्या महत्त्वावर बल देऊन स्त्री-शिक्षण आणि बालशिक्षण सुरू केले.

दि: 18/1/25




ग्रंथसार लेखन स्पर्धा

समीक्षाचे नाव: शिवम सुरेशराव कंधारकर
शिर्षक : पानिपत
लेखकाचे नाव : प्रभाकर
सारांश :

सारांश

पानिपत हा ग्रंथ विश्वू प्रभाकर यानी लिहिलेला एक ऐतिहासीक कादंबरी आहे या कादंबरी पानीपतच्या तीसऱ्या युद्धाच्या मराठे आणि अफगात अलीवर्दी खान याच्यातील संघर्ष दर्शवला आहे.
ग्रंथात युद्धाच्या पार्श्वभूमीवर घटनांच्या तपशीलवार वाचकांसमोर येतात.
कादंबरीत युद्धाच्या गडद शोकांतिका संघर्ष आणि विरते चित्रण आहे यात मराठा साम्राज्याच्या पतनाचे कारण त्यांचे नेतृत्व आणि पराभूत होणाऱ्याच्या कडवट्या काळात आलेला संकटाचे चित्रण आहे.
युद्धाच्या आणि रणभूमीवर आधारित कहाणि उलगडले

दि: 5,11, 2025




ग्रंथसार लेखन स्पर्धा

स्पर्धकाचे नाव: काळे वैभव तुकाराम

ग्रंथ नाव : संत ज्ञानेश्वरी

लेखकाचे नाव : श्री कृष्णाची भगवद्.

प्रकाशन व स्थळ:

आरंभ ग्रंथ.

ज्ञानेश्वरी हा संत ज्ञानेश्वरांनी रचलेला एक महत्त्वपूर्ण तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ आहे. या ग्रंथामध्ये भगवान श्री कृष्णाची भगवद् गीतेतील उपदेशाची मराठीत विस्तृत आणि सोपी व्याख्या, हे ग्रंथ मानवाच्या जिवनातील तत्त्वज्ञान, अध्यात्म आणि कर्मयोग यावर केंद्रित आहे. ज्ञानेश्वरीत कर्म, भक्ति, ज्ञान आणि योग या चार मार्गांवर विचार केला आहे. संत ज्ञानेश्वरांच्या गोड भाषेत दिलेल्या उपदेशामुळे अनेक वाचनप्रेमींचे हृदय जिंकत झाले आहे. त्यांनी भगवद् गीतेतील तत्त्वज्ञान नवा दृष्टिकोन देऊन, दिले. सहज समजण्यास योग्य बनवले आहे.

दि-5-1-2025




"ग्रंथसार लेखन स्पर्धा"

स्पर्धकाचे नाव :- समाधान राजाराव पुनमवार
शीर्षक :- श्रीमान योगी
लेखक :- रणजीत देसाई
प्रकाशन व स्थळ :-

सारांश :-

"श्रीमान योगी" हे रणजीत देसाई यांची ऐतिहासिक कादंबरी आहे. या कादंबरीत छत्रपती शिवाजी महाराजांच्या जीवनाची कथा वर्णन होत, त्यांच्या संघर्षाची गोष्ट उलगडते. कादंबरीत शिवाजी महाराजांचे राजकारण, धाडस, न्याय, शौर्य, आणि नेतृत्व यांचे सुंदर चित्रण आहे.

तसेच, त्यांची राज्याभिषेकापासून ते मुघल सम्राट औरंगजेबाच्या विरोधात लढाई करण्यापर्यंतची धाडसी कृत्ये आणि निर्णय स्पष्टपणे दाखवली आहेत. कादंबरीत त्यांच्या कुटुंबीयांसह त्यांच्यातील मानवी भावना, आणि त्यांची वागणूक योग्या दृष्टीने दर्शवलेली आहे.

या कादंबरीत शिवाजी महाराजांचे धाडसी कार्य, वीरता, आणि राजकारणी दृष्टिकोन अशा अनेक पैलूंवर प्रकाश



* ग्रंथसार लेखन स्पर्धा *

समीक्षकाचे नाव :- श्रीदेवी संजय बाभुळकर

शीर्षक :- कोसबाडची टेकडी
लेखकांचे नाव :- ~~अमरसकर~~ डा. न. म. रास्कर
प्रकाशन व स्थळ :-

~~सारांश~~ शिफारस :-

"कोसबाडची टेकडी" या ग्रंथाची शिफारस मी समाजशास्त्राचे विद्यार्थी, साहित्यप्रेमी, आणि ग्रामीण जीवनावर विचार करणारे व्यक्तींना करेन.

माझ्या शिफारशीचे कारण असे आहे :-

ग्रामीण जीवनाचे आकलन : कादंबरीत ग्रामीण भागातील जीवनाची वास्तववादी आणि सजीव चित्रण केली आहे. ग्रामीण समाजाच्या संघर्षावर आधारित असलेल्या या कादंबरीमुळे त्या जीवनाचे गहन समजावता येत होती.

सामाजिक विचार :- कादंबरीमध्ये शोषण, वर्गभेद आणि संघर्ष यावर विचारमंथन केली आहे. या कादंबरीतील तत्वज्ञान आणि दृष्टिकोन त्या व्यक्तींना उपयुक्त ठरु शकतो ज्यांना सामाजिक बदल, शोषण विरोध आणि न्याय यावर विचार करायचा आहे.

साहित्याची गोडी लागलेल्या व्यक्तींना : कादंबरीतील संवाद, वर्णन आणि कथानक सजीव आहे. त्यामुळे साहित्याची गोडी लागलेली व्यक्ती यावर गहन

दि. 5/1/2025



★ ग्रंथसार लेखन स्पर्धा ★

समीक्षकाचे नाव :- रतिषा संतोष क्षेत्रेकर
शिर्षक :- "गीतांजली"
लेखकांचे नाव :- रविंद्रनाथ टागोर
प्रकाशन व स्थळ :-

सारांश :-

आध्यात्मिकता आणि तत्वज्ञाना-वर विचार करणारे विद्यार्थी : ज्यांना ईश्वराशी एकात्मता, आध्यात्मिक विचारधारा, आणि मानवी जीवनाच्या गहिरा अर्थ समजून घ्यायची आहे, त्यांना हा ग्रंथ वाचायला शिफारस केली जाऊ शकते

कविता आणि साहित्य प्रेमी : जो व्यक्ती काव्याची गोडी लागलेली आहे आणि कविता वाचनाचा अनुभव घेतो, त्याला रवींद्रनाथ ठाकुर यांची कविता, विशेषत: "गीतांजली", एक अव्दितीय अनुभव देईल.

मानसिक शांती शोधणारे व्यक्ती : "गीतांजली" मध्ये जीवनातील कष्ट, प्रेम, शांती, आणि आध्यात्मिक शांततेसाठी प्रेरणा हवी आहे, त्यांना हा ग्रंथ उपयुक्त ठरु शकतो.

दि. 5/1/2025




✯ ग्रंथसार लेखन स्पर्धा ✯

स्पर्धकाचे नाव :- शिवशंकर राघोबा सावंत
शिर्षक :- "Budha and His Dhamma".
लेखकांचे नाव :- डॉ. बाबासाहेब आंबेडकर

"बुद्ध आणि त्यांचा धम्म"

हा ग्रंथ डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी लिहिलेला आहे, जो गौतम बुद्ध यांच्या जीवन, तत्वज्ञान आणि धर्मावर आधारित आहे. आंबेडकर यांनी या ग्रंथात बौद्ध धर्माच्या तत्वज्ञानाचे सखोल विश्लेषण केले आहे आणि बुद्ध धर्माचे महत्व समजून सांगितले आहे. हा ग्रंथ बुद्धांच्या जीवनाची कहाणी, त्यांचे तत्वज्ञान, आणि त्यांचे समाज सुधारणा कार्य यावर प्रकाश टाकतो.

ग्रंथात बुद्धांचे जन्म, त्यांचा राजमहलातील जीवन, त्यांचे तपस्वी जीवन, आणि त्यांचे ध्यान व्रत आणि त्याग यांचा उल्लेख आहे. बुद्धांनी समाजातील असमानता, शोषण आणि अन्यायावर कडक भाष्य केले, तसेच त्यांनी नि:स्वार्थतेचा आणि अहिंसेचा प्रचार केला. आंबेडकर यांनी बौद्ध धर्माची पुनर्रचना केली आणि त्या आधारावर दलित आणि शोषित समाजाला एक नवा मार्ग दाखवला "Budha and His Dhamma" मध्ये आंबेडकर यांनी बौद्ध तत्वज्ञानाची प्रगल्भ आणि त्याच्या समाज कल्याण कारी दृष्टिकोनाची सखोल माहिती दिली आहे.

१८.०५।०१।2025




# * ग्रंथसार लेखन स्पर्धा *

समीक्षकाचे नाव :- धनश्री राजु आंबलवाड

शिर्षक :- " गुलामगिरी "

लेखकाचे नाव :- महात्मा जोतीराव फुले

प्रकाशन व स्थळ :-

---

सारांश :-

" गुलामगिरी " हा ग्रंथ महात्मा जोतिराव फुले यांनी १८७३ मध्ये लिहिला. या ग्रंथात फुले यांनी भारतातील जातीव्यवस्था आणि तिच्या कुपरिणामांवर तीव्र प्रहार केले आहेत. " गुलामगिरी " म्हणजे गुलामीचे जीवन किंवा दासत्व, आणि फुले यांनी या ग्रंथात भारतातील अस्पृश्यता, जातिव्यवस्था, व स्त्रीच्या दुय्यम स्थितीवर नेमके आणि स्पष्टपणे भाष्य केले आहे.

फुले यांनी विशेषत: ब्राम्हणांच्या अत्याचार, जातीभेद, आणि सर्वसामान्य लोकांच्या शोषणावर लक्ष केंद्रीत केले. ते म्हणतात की भारतीय समाजात उच्च जातीच्या लोकांनी गरीब, शेतकऱ्यांचे, महिलांचे आणि दलितांचे शोषण केले आहे. " गुलामगिरी " हा एक प्रकारे त्या काळातील शोषित वर्गासाठी आवाज उठवण्याचा एक प्रयत्न होता. फुले यांची लेखनशैली अत्यंत सोपी, परंतु तीव्र आणि प्रभावशाली आहे, जी वाचकांना त्यावेळच्या समाजाच्या अन्यायाची जाणीव करुन देणारी आहे.

ग्रंथसार अध्ययन स्पर्धा

कवि कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ रामटेक




समिक्षकाचे नाव - अंकुश बाळसिंग सावळे

शिर्षक - रणांगण

रणांगण हा ग्रंथ न. मा. मुळगावकर यांचा एक महत्वपूर्ण ऐतिहासिक कादंबरी आहे. या कादंबरीत भारतीय स्वातंत्र्य संग्रामाच्या कालखंडातील संघर्ष, वीरता आणि बलिदान यांचे चित्रण केले आहे. या कादंबरीतुन मुळगावकर यांनी स्वातंत्र्यलढ्याच्या वेगवेगळ्या पैलुंवर लक्ष केंद्रित केले आहे. ज्यात सैनिकांच्या मानसिकतेपासुन ते शहीद होणाऱ्या वीरांच्या कथेपर्यंत अनेक गोष्टी दाखवल्या आहेत.

कादंबरी नायक आणि नायिका हे एक आदर्श व्यक्तीमत्व असलेले आहेत. जो आपले कर्तव्य पार करतांना आपल्या देशासाठी सर्व काही गमावतात रणांगणाच्या माध्यमातुन मुळगावकर यांनी समाजाच्या सर्व स्तरातील लोकांच्या संघर्षाचे चित्रण केले आहे या कादंबरीत स्वातंत्र्य संग्रामातील युद्ध धोरणे आणि प्रत्येक लढ्याच्या सामाजिक आणि मानसिक परिणाम सांगितला आहे. रणांगण हा ग्रंथ स्वातंत्र्य संग्राम आणि वीरता या विषयात रुची असलेल्या विद्यार्थ्यांना आणि इतिहास प्रेमींना शिफारस केला जाऊ शकतो. या कादंबरीत स्वातंत्र्य संग्रामाच्या

# * ग्रंथसार लेखन स्पर्धा *




नाव => साक्षी बापुराव ढगे
विषय :=> अर्थशास्त्र
लेखकाचे नाव :=> कौटिल्य
प्रकाशन स्थळ :=> आदर्श प्रकाशन नागपूर

**सारांश :=>**

"अर्थशास्त्र" कौटिल्य लिखीत ग्रंथ प्रसिद्ध ग्रंथ म्हणून ओळखला जातो. प्राचीन भारतीय अर्थशास्त्रावर आधारित आहे. त्यांच्या ग्रंथी अर्थशास्त्र मध्ये राज्यशास्त्र, अर्थव्यवस्था, न्याय व समाजाची चांगली संरचना कशी करावी यावर व्यापक विचार मांडले आहे.

सदर ग्रंथात व्यापार, कर, उत्पादन वितरण बाजारपेठ व जनतेच्या कल्याणाचे महत्त्व यावर सखोल चर्चा केली आहे.

**शिफारस :=>**

होय, ग्रंथ विशेषतः विद्यार्थ्यांना शिफारस केला जाऊ शकतो. राजकारणी विज्ञान व आर्थिक धोरणांवर अभ्यास करणारे विद्यार्थी तसेच प्राचीन भारतीय विचारधारेत रुचि असलेले विद्यार्थी यासाठी ग्रंथ उपयुक्त आहे.

# दमयंतीताई देशमुख बी.एड. कॉलेज, रामटेक
नगरधन रोड, रामटेक

दुरध्वनी क्रं. 92265 83498


## अहवाल

## दमंयतीताई देशमुख बी.एड्. कॉलेज, रामटेक

## उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि. 20.12.2024 नुसार

## दमंयतीताई देशमुख बी.एड्. कॉलेज, रामटेक

## वाचन संकृल्प महाराष्ट्राचा पंधरवडा साजरा

## दि. 30 डिंसेबर 2024 ते 21 जानेवारी 2025

उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि. 20.12.2024 नुसार सर्व महाविद्यालय/शाळेत "वाचन संकल्प महाराष्ट्राचा" हा पंधरवडा साजरा करण्याबात आदेश प्राप्त झालेले आहेत. त्यानुसार महाविद्यालयाच्या रामटेक येथे वाचन संकल्प महाराष्ट्राचा या उपक्रमांतर्गत दि. 30 डिंसेबर 2024 ते 21 जानेवारी 2025 पर्यंत विविध स्पर्धा आयोजित करण्यात आल्या होत्या.

### दि. 04/01/2025 सामुहिक वाचन स्पर्धा

वाचन संकल्प महाराष्ट्राचा या कार्यक्रमातंर्गत महाविद्यालयाच्या वाचनकक्षात सामुहिक वाचन स्पर्धेचे आयोजन करण्यात आले होते. या कार्यक्रमात 30 पेक्षा जास्त विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला असून विद्यार्थ्यांना समाजसुधारक, थोर व्यक्ती, इतिहासातील महान स्त्रिया, याची माहिती देणाऱ्या पुस्तकांचे सामुहिक वाचन विद्यार्थ्यांनी केले त्यात विद्यार्थ्यांचा उत्साह द्विगुणात होता.



दि. 06/01/2025 निबंध स्पर्धा

"वाचन संकल्प महाराष्ट्राचा" या कार्यक्रमाअंतर्गत विद्यार्थ्याकरीता निंबध स्पर्धेचे आयोजन करण्यात आले होते. निबंधाचा विषय " वाचन संस्कृती या विषयावर एकुण 20 पेक्षा जास्त विद्यार्थ्यांकडून निबंध मागविण्यात आले. उत्कृष्ट निबंध लिहिणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रथम, द्वितीय, तृतीय असे 03 पारीतोषिक दि. 25 जाने. 2025 रोजी देण्यात येणार आहेत.



दि. 04/01/2025 ग्रंथाचे परिक्षण व कथन स्पर्धा

"वाचन संकल्प महाराष्ट्राचा" या अभिनव अतंर्गत विद्यार्थ्यांना समाजसुधारक, , थोर व्यक्ती, वैज्ञानिक, इतिहासातील महान स्त्रिया, याची माहिती देणाऱ्या पुस्तकांचे वाचन करून परिक्षण करून त्यावर विद्यार्थ्यांनी कथन च्या माध्यामाने सर्व विद्यार्थ्यांसमोर आपले मनोगत मांडले. त्यात वैष्णवी दिक्षीत, तन्नू धावडे, रूपाली भोयर या विद्यार्थ्यांनी पुस्तकांचे कथन केले.



## दि. 10/01/2025 ग्रंथ दिंडी

उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि. 20.12.2025 नुसार सर्व महाविद्यालय/शाळेत "वाचन संकल्प महाराष्ट्राचा" हा पंधरवडा साजरा करण्याबाबत आदेश प्राप्त झालेले होते. त्यानुसार रामटेक येथे वाचन संकल्प महाराष्ट्राचा या उपक्रमांतर्गत ग्रंथ दिंडी चे आयोजन दि.10/01/25 रोजी आयोजित करण्यात आलेले होते. या ग्रंथ दिंडी चे उद्घाटन मा. राज्यमंत्री आशिष जयस्वाल व विश्वविद्यालयाचे मा. कुलगुरू प्रा. हरेराम त्रिपाठी यांच्या हस्ते करण्यात आले या ग्रंथ दिंडीत दमयंतीताई देशमुख बी.एड्. कॉलेज, रामटेक येथील 50 पेक्षा जास्त विद्यार्थ्यांनी सहभाग घेऊन पालीखीच्या माध्यमाने ग्रंथ दिंडी चा उत्साह वाढवीला.



## दि. 15/01/25 ग्रंथ प्रदर्शनी

"वाचन संकल्प महाराष्ट्राचा" या अभिनव उपक्रम अतंर्गत ग्रंथ प्रदर्शनी चे आयोजन मा. ग्रंथपाल अतुल बुरडकर यांनी महाविद्यालयातील ग्रंथालयात विविध पुस्तकांची प्रदर्शनी त्यात संस्कृत साहित्य, भाषा साहित्य कोश, रामायण, भगवतगिता, महाभारत, श्रीकृष्ण, ज्ञानेश्वरी, संविधान, डिक्शनरी, विविध विषयाच्या शैक्षणिक पुस्तकांची प्रदर्शनी भरवण्यात आली, प्रदर्शनी आस्वाद उत्साह पुर्ण घेतला विद्यार्थ्यांना पुस्तका वाचवण्याची आवड झाली.



H.O.D.
Damayantitai Deshmukh
B.Ed. College,
Mouda Road, Ramtek

## दमयंतीताई देशमुख बी.एड कॉलेज रामटेक

### वाचन संकल्प महाराष्ट्राचा जानेवारी 2025

| अनु.क. | विद्यार्थ्यांचे नाव | विद्यार्थ्यांचे वर्ग कमांक कक्ष | ग्रंथाचे नाव व लेखकाचे नाव | प्रकाशन |
|---|---|---|---|---|
| 1 | किर्ती गोपाल येनुरकर | बी.एड द्वितीय वर्ष | अहिल्याबाई होळकर/ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |
| 2 | अलिषा राजेंन्द्र ढोबळे | बी.एड द्वितीय वर्ष | इकिगाई/हेक्टर गारासिया आणि फ्रॅान्सेलिया | पोगिंग रॅन्डम हॉईस इंडिया |
| 3 | रुपाली दिलीप भोयर | बी.एड प्रथम वर्ष | स्वामी विवेकानंद(संक्षिप्त चरित्र आणि विचारधन)/प्रा.सौ शारदा जोशी | विद्या भरती प्रकाशन पुणे |
| 4 | तन्नु कपुरचंद ढवळे | बी.एड प्रथम वर्ष | स्वामी विवेकानंद(संक्षिप्त चरित्र आणि विचारधन)/प्रा.सौ शारदा जोशी | विद्या भरती प्रकाशन पुणे |
| 5 | रत्नमाला युवराज ढेंगे | बी.एड द्वितीय वर्ष | सत्याचे पुजारी गांधीजी / शैलेजा काळे | ज्ञानेश प्रकाशन |
| 6 | प्रणाली युवराज चवरे | बी.एड द्वितीय वर्ष | डॉ. राधाकृष्णन /ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |

H.O.D.
Damayantitai Deshmukh
B.Ed. College,
[illegible] Road, Ramtek

1 Date: 12 जानेवारी 2025

Page No.:
Date:

समीक्षकाचे नाव
कु. आलिषा राजेंद्र ढोबळे.

शीर्षक : इकिगाई

लेखक :
हेक्टर गारसिया आणि
फ्रान्सेस्क मीरालेस

प्रकाशन व स्थळ :
पेंगिन रँन्डम हाउस, इंडिया.

जपानीस लेखक हेक्टर गारसिया आणि फ्रान्सेस्क मीरालेस यांनी 'इकिगाई' हे पुस्तक 2016 साली लिहिले. संपुर्ण जगातील जनतेने या पुस्तकास मोठ्या प्रमाणात प्रतीसाद दिला.

थोडक्यात सारांश :-

हे पुस्तक दीर्घ आणि आनंदी जीवन जगण्याचे रहस्य उलगडण्याविषयी बोलत आहे. ओकिनावा बेटावरील रहिवासी जगातील इतर कोणत्याही लोकांपेक्षा जास्त काळ जगतात. निरोगी आहार, साध्या बाह्य क्रियाकलाप आणि उपोष्णकटिबंधीय हवामानाव्यतिरिक्त, ही इकिगाई आहे जी त्यांच्या जीवनाला आकार देते. जपानी लोकांच्या मते प्रत्येकाला एक Ikigai असते. एकदा तुम्ही ते शोधून काढल्यानंतर, त्याचा पाठपुरावा करा, त्याचे पालणपोषण करा आणि ते तुमच्या जीवनाला अर्थ देईल. ज्या क्षणी तुमच्या जीवनाला एक उद्देश असेल त्या क्षणी तुम्ही करत असलेल्या

Shree Radhe

प्रत्येक गोष्टीत तुम्ही आनंदी प्रवाह प्राप्त कराल. पुस्तकात, आम्ही 'ओकिनावाच्या शताब्दी वर्षांच्या मुलाखतींच्या मालिकेतून जातो आणि त्यांनी आनंदी, निरोगी आणि दिर्घ आयुष्य जगण्याचे मार्ग शोधले आहेत.

1. सक्रिय रहा; निवृत्त होऊ नका.
2. 80%. पोट भरा
3. चांगल्या मित्रांसह स्वतःला वेढून घ्या
4. रोज व्यायाम करा
5. लवचिक व्हा
6. जेवना दरम्यान स्नॅकिंग थांबवा
7. हळूहळू कर्ज फेडावे
8. विषारी लोकांसोबत वेळ घालवणे टाळा
9. सोशल मीडियावर कमी वेळ घालवा

शिफारशी :–

होय, मी त्या प्रत्येक व्यक्तीला ही पुस्तक शिफारस करेल जे त्यांच्या जीवनाबद्दल अतिशय गोंधळलेले आहेत व कठिण परिस्थीतींनी वेढलेले आहेत.

सर्वसाधारणतः ही पुस्तक प्रत्येक व्यक्तीला वाचायला हवी, कारण या पुस्तकातून, आपल्याला चांगले जीवन जगण्याचे सुत्र शोधता येते.

दिनांक:- 14/01/2025

समीक्षकाचे नाव: किर्ती गोपाल येनुरकर
B.ed 2nd year

शीर्षक:- अहिल्याबाई होळकर

लेखक:- ज्ञानेश्वर भिवगडे

प्रकाशन व स्थळ: लाखे प्रकाशन
नागपूर

"भारतभर पसरली किर्ती जिची,
तीर्थक्षेत्री बांधील्या धर्म शाळा,
उदार कारूण्यमूर्ती अहिल्यामाता,
रयतेस लावला तीने लळा."

अहिल्याबाई होळकर यांचा जन्म 31 मे 1725 मध्ये महाराष्ट्रातील चोंडी या गावी झाला त्यांच्या वडिलांचे नाव माणकोजी शिंदे तर आईचे नाव सुशीलाबाई होते. ज्या काळात महिलांना घराबाहेर पडण्याची देखील परवानगी नव्हती त्या काळात अहिल्याबाईच्या वडिलांनी त्या शिक्षणाची संधी दिली अहिल्याबाई एक कर्तुत्वान, बुद्धीमान, राज्यकर्त्या होत्या.

अहिल्याबाईच्या 8 व्या वर्षी त्यांचा विवाह माळवा प्रांत्याचे सुभेदार मल्हारराव होळकरांचे सुपुत्र खंडेराव यांच्याशी झाला अहिल्याबाई व खंडेराव यांच्या संसाराला मलेराव व खंडेराव यांची आईच्या आशिर्वादाने

सुरुवात झाली. आणि अहिल्याबाईंचे पती खंडेराव यांना कुंभेरीच्या लढाईत वीरमरण आले. त्यानंतर 12 वर्षांनी त्यांचे सासरे मल्हारराव होळकर यांचे निधन झाले. त्यानंतर अहिल्याबाईंनी माळवा प्रांताचा कारभार आपल्या हाती घेऊन जवळ 28 वर्षे प्रजाहितदक्ष राज्यकारभार केला. परकीय आक्रमणात उध्वस्त झालेल्या शेकडो मंदिरांची त्यांनी सुधारणा केली.

मंदिरे, नदीघाट, तलाव, अन्नछत्र बारव व धर्मशाळांची त्यांनी उभारणी केली. 18 व्या शतकात महिलांची भारतातील पहिली प्रशिक्षित सेना त्यांनी उभी केली. मुक्ताबाई नावाच्या मुलीचा विवाह त्यांनी यशवंतराव फणसे या शूर पुरुषाशी आंतरजातीय विवाह लावून दिला. पूर्वीच्या कायद्यामध्ये सुद्धा त्यांनी सुधारणा घडवून आणली. डोंगर प्रदेशामध्ये व इतर भागामध्ये जनतेच्या त्रास देणाऱ्या चोर, लुटेऱ्यांचा बंदोबस्त करून त्यांचे पुनर्वसन केले. त्याच प्रमाणे पशु, पक्षी, किटक व जलचरांच्याही अन्नाची व्यवस्था केली.

प्रजा हीच आपली संपत्ती आहे. असे म्हणून त्यांनी संपूर्ण राज्याचे पालकत्व घेतले. त्यांना रामराज्य निर्माण करायचे होते. त्यासाठी आपली दुःख बाजूला ठेवून रयतेच्या सुखासाठी आयुष्यभर झिजल्या. अहिल्याबाईंच्या राज्यकारभारही अतिशय पारदर्शक होता

अहिल्याबाई या स्वतः खंबीर, स्वाभिमानी व तेजस्वी व्यक्तिमत्वाच्या होत्या. अशा या प्रजाहितकारिणी, अष्टावधानी, न्यायदेवता पुण्यात्मा राजमाता अहिल्याबाई होळकर यांचा मृत्यू १३ ऑगस्ट १७९५ रोजी झाला. शेवटी मी एवढेच बोलू इच्छिते,

जात धर्म विसरून दाखवला,
मानव सेवेचा मार्ग नवा....
अहिल्याबाई होळकर आपल्या कार्याचा
निरंतर जळत राहील दिवा....

दमयंती नाईक देशमुख बी.एड्. कॉलेज, रामटेक

"वाचन संकल्प महाराष्ट्राच्या अभिनव उपक्रम"

सामुहिक वाचन, पुस्तक परिक्षण व कथन स्पर्धा

सत्र २०२४ - २०२५

नाव:- रुपाली दिलीपजी भोयर

वर्ग:- बी.एड्. प्रथम वर्ष

स्वामी विवेकानंद (संक्षिप्त चरित्र व विचारधन)
प्रा. सौ. शारदा जोशी

प्रकाशक:- विद्यार्थी प्रकाशन पुणे

# "स्वामी विवेकानंद"

इ.स. १८९३ मध्ये अमेरिकेत शिकागो येथे भरलेल्या जागतिक सर्वधर्मपरिषदे मध्ये 'माझ्या प्रिय बंधुभगिनींनो' असे उद्‌गार काढुन विश्वबंधुतेचे नाते प्रस्थापित करणारे स्वामी विवेकानंद कोणाला बरे परिचित नाहीत? आपण त्यांना स्वामी विवेकानंद या नावाने ओळखत असलो तरी त्यांचे मुळ नाव हे नरेंद्र असे होते.

१२ जानेवारी १८६३ या दिवशी त्यांचा जन्म झाला. त्यांच्या वडिलांचे नाव विश्वनाथबाबू व आईचे नाव भुवनेश्वरी देवी होते. त्यांचे वडील पेशाने वकील होते. त्यांचा स्वभाव उदार व दुःखितांविषयी कणव असणारा होता. आई भुवनेश्वरी देवी बुद्धिमान व वृत्तीने धार्मिक होत्या. अशा मातापित्यांनी नरेंद्रवर उत्तम संस्कार करुन त्यांच्या वृत्ती घडवल्या.

बाल नरेंद्रवर फार संस्कार होते. बाल नरेंद्र फार अवखळ व खोडकर होता. त्याला विविध खेळांची आवड होती. त्यांच्या वडिलांनी त्याला थोर समाजसुधारक ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या शाळेत घातले. तेथेही नरेंद्रवर संस्कार घडले.

बालपणापासुन नरेंद्रला उत्तम एकाग्रतेची देणगी लाभली होते. त्यायोगे तो कोणताही विषय चटकन आत्मसात करीत असे. शालेय अभ्यासातही हुशार असल्याने तो मॅट्रिकची परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाला.

पुढील अभ्यासासाठी त्याने महाविद्यालयात नाव दाखल केले. सर्वच विषयांमध्ये त्याला सारखीच गोडी होती.

वाचनालयात जाऊन तो नाना विषयांचे वाचन करी. तत्वज्ञानाचे मिळालेले सर्व पाश्चिमात्य ग्रंथ त्याने वाचुन काढले. त्यामुळे त्याची तीक्ष्ण चिकित्सक बनली.

नोव्हेंबर १८८० मध्ये नरेंद्रचा परिचय दक्षिणेश्वरात रामकृष्ण परमहंसाशी झाला.

त्यांना नरेंद्रविषयी अनिवार जिव्हाळा निर्माण झाला. ते नरेंद्रचे गुरु झाले. त्यांनी योगमार्गाचा आपला वारसा नरेंद्रकडे सोपवुन पुढे कार्य करण्यास सांगितले. तेथे नरेंद्रच्या आयुष्याला कलाटणी मिळाली.

नरेंद्राने हिंदु धर्म व तत्वज्ञान यांच्या सखोल अभ्यास केला. १८९३ मध्ये त्यांना अमेरिकेतील 'शिकागो' येथे भरणाऱ्या जागतिक सर्वधर्मपरिषदेची माहिती समजली.
त्यांची योग्यता जाणलेल्यांनी त्यांनी या परिषदेस जावे असा आग्रह धरला. सर्व प्रकारच्या साहाय्याची तयारी दर्शवली. नरेंद्राने या परिषदेस जाण्याचा निश्चय केला. त्यांनी संन्यासाचा स्वीकार केला व स्वामी विवेकानंद हे नाव धारण केले.
३१ मे १८९३ रोजी ते शिकागोस गेले. तेथे परिषदेस उपस्थित असणारे सर्व जगातून आलेले नाना धर्मीय लोक स्वामी विवेकानंदाच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाने प्रभावित झाले. तेथे कोणत्याही धर्मपंडिताने न म्हटलेले 'माझ्या बंधुभगिनींनो', असे जगाविषयी आत्मीयता प्रस्थापित करणारे उद्गार काढून श्रोत्यांची मने जिंकली. त्यांच्या हृदयाचीच पकड घेतली. तेथे केलेल्या व्याख्यानात त्यांनी 'सर्वधर्म एकच अंतिम उद्दिष्टासाठी आहेत. एकाच मार्गाच्या वाटसरूमध्ये परस्पर दुजाभाव आणि अविश्वास शोभत नाही. एका धर्माचा दुसऱ्या धर्माशी झगडा असूच शकत नाही.
सर्व धर्मांना अधर्माशी लढायचे आहे.' असे सर्व धर्मांमध्ये अनुपम स्नेहबंध निर्माण करणारे उद्गार काढले. त्यामुळे परिषदेमध्ये एकमेकांना वादात जिंकण्याऐवजी नवे स्नेहसौहार्दाचे व समजुतदारपणाचे वातावरण निर्माण झाले. या परिषदेमध्ये त्यांनी ओघवत्या भाषेत हिंदु धर्माची श्रेष्ठता व उदात्तता सर्वांना पटवून दिली.
या परिषदेनंतर स्वामी विवेकानंद दोन वर्षे अमेरिकेत कार्यरत राहिले. त्यांच्या मित्रपरिवार वाढला. त्यांच्या चाहत्यांनी तेथे त्यांची अनेक व्याख्याने घडवून आणली. त्यातून विवेकानंदानी हिंदू धर्माचा महान संदेश तेथील लोकांपर्यंत पोचवला.
अवघे ३९ वर्षांचे आयुष्य स्वामी विवेकानंदाना लाभले. पण या अल्पावधीत त्यांनी युगानयुगांचे प्रचंड कार्य केले. पाश्चात्य देशातील भौतिकतावादाच्या भारतीय अध्यात्मवादाशी

समन्वय साधण्याचा प्रयत्न केला.
भारताच्या थोर संस्कृतीचा व उदात्त मानवतावादी तत्वज्ञानाचा जगाला परिचय करून देण्याचे महान कार्य करून स्वामी विवेकानंदांनी भारताच्या भावी पिढ्यांसाठी एक थोर आदर्श व वारसा ठेवला आहे.
त्यांनी म्हटले आहे की अगदी नास्तिक झालात तरी चालेल, परंतु अंधश्रद्धा ठेवणारे मुर्ख होऊ नका, कारण नास्तिक झाला तरी त्याचा ठायी जिवंतपणा असतो. त्यांचे आपल्याला काहीतरी करता येईल. परंतु अंधश्रद्धा शिरली म्हणजे बुद्धीच मेली, मंद होत चालली आणि बुद्धी गेली म्हणजे सारेच गेले. जीवनाचा अंधःपात झाला.
आपण स्वतंत्र आहोत. दैव नावाची कोणतीही गोष्ट नाही. आपल्याला जबरदस्तीने काही करावयास भाग पाडील अशी कोणतीही वस्तु या जगात नाही.
आपण केलेले आपणच नाहिसे करू शकतो. कमकुवत माणसे जेव्हा सर्वस्व गमावतात व स्वतःला दुर्बल समजतात तेव्हा ती जोतिष्य वगैरेकडे वळतात.
खरा वीरपुरुष गाजावाजा न करता शांतपणे कार्य करीत राहतो. सच्चरित्र माणसे सर्व नियमांच्या पलीकडे जातात आणि कोणत्याही परिस्थितीत राहणाऱ्या आपल्या बांधवांना स्वतःचा विकास करून घेण्यास सहाय्य करतात.
भुते नाहीत असा तुमच्यापैकी पुष्कळांचा ठाम विश्वास असतो. पण जरा अंधारात जाताच तुमचं अंग थरथरायला लागतं!
याचं कारण हेच की लहानपणापासून त्या साऱ्या भीतीच्या कल्पना आपल्या डोक्यात कोंबण्यात आलेल्या आहेत. म्हणून समाजाच्या भितीने, लोकमताला जाऊन, आप्तेष्टांचा रोष ओढवेल या धास्तीने किंवा इतक्या दिवसांच्या समजुती कशा सोडवायच्या ह्या भीतीने त्या असल्या साऱ्या गोष्टी इतरांना कदापि शिकवू नका.
नवनव्या मौलिक कल्पना शोधण्याचा प्रयत्न तुम्ही केला पाहिजेत.

या जगातील अखंड चालू असणाऱ्या घडामोडीमध्ये सर्वात श्रेष्ठ घटना म्हणजे उदार आदर्शाचा उदय ही होय.
समोर एखादा आदर्श असलेला मनुष्य जर हजार चुका करील तर माझी खात्री आहे की कोणताही आदर्श नसणारा मनुष्य पन्नास हजार चुका करील. असे व अनेक विचार त्यांनी सांगितले.
राष्ट्र उभारणीचे दिव्य स्वप्न उराशी बाळगून कार्य करीत असतानाच स्वामी विवेकानंदांची प्रकृती मात्र खंगत चालली होती. त्यांनी न्यूयॉर्कमध्ये वेदांत सोसायटीची स्थापना केली. तसेच त्यांनी कॅलिफोर्नियात शांति-आश्रम स्थापन केले. आश्रमवासीयांशी त्यांनी निरनिराळ्या प्रश्नांवर चर्चा केली. नंतर शांतपणे योगमार्गाने त्यांनी देहविसर्जन केले.
अवघे ३९ वर्षांचे आयुष्य स्वामी विवेकानंदांना लाभले.

रुपाली दिलीप भोयर
बी.एड्. प्रथम वर्ष

Date :- 12 जानेवारी 2025.

बी.एड् 2nd year 3rd sem.

समीक्षकाचे नाव :-
कु. प्रणाली युवराज चावरे.

शीर्षक :- डॉ. राधाकृष्णन

लेखक :- ज्ञानेश्वर भिवगडे

प्रकाशन व स्थळ :- लाखे प्रकाशन, नागपुर

लेखक ज्ञानेश्वर भिवगडे यांनी शिक्षक दिन हे पुस्तक लिहीले. सप्टेंबर महीन्यातील पाच तारीख या दिवशी 'शिक्षक दिन' सर्वत्र साजरा केला जातो.

* थोडक्यात सारांश :-

हे पुस्तक दिर्घ आणि आनंदी जीवन जगण्याचे रहस्य उलगडण्याविषयी बोलत आहे. 5 सप्टेंबर हा दिवस आपण 'शिक्षक दिन' म्हणुन साजरा करीत असतो. सप्टेंबर महीन्यातील पाच तारीख या दिवशी 'शिक्षक दिन' सर्वत्र साजरा केला जातो. 'शिक्षक' या शब्दाच्या विस्तारपुर्वक अर्थ शिक्षक या दिवशी विद्यार्थ्यांना स्पष्ट करुन सांगतात. व 'शिक्षक दिन' कोणत्या महान विद्यार्थ्यांना स्पष्ट करुन सांगतात. कोणत्या महान शिक्षकाच्या आठवणीमुळे साजरा केला जातो. याबद्दलही विद्यार्थ्यांना माहीती मिळते. डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन यांचा जन्म 5 सप्टेंबर १८८८ ला झाला. काही व्यक्तींच्या बाबतील त्यांचा जन्मदिन म्हणजे देशाचे भाग्यदिवस ठरतात.

Page No.:
Date :

या पुस्तकामध्ये शिक्षक म्हटले की, शिकवणारी 'विभुती' असा जरी अर्थ घेतला जातो तरी खऱ्या अर्थाने शिक्षक शिकवण्यासोबत विदयार्थ्याला घडविण्याचे महत्त्वपुर्ण कार्य करीत असतात.

शिक्षकांच्या घडविण्यावर विद्यार्थ्यांचे भविष्य घडत असते. 'शिक्षक दिन' या दिवशी प्रशंसनीय कार्य करणाऱ्या शिक्षकांना शासनाकडुन पुरस्कृत केला जातो. डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन हे एकमेव शिक्षक ठरतात.

* शिफारशी :-

शिक्षक हा असा व्यक्ती आहे, तो प्रत्येक विदयार्थ्यांचे जिवन उज्वल करतो. म्हणजेच तो अंधाराकडुन प्रकाशाकडे घेऊन जातो. विदयार्थ्याला घडविण्याचे कार्य करीत असतो. शिक्षका शिवाय दुसरा कोणी जगात थोर नाही. शिक्षक हा असा व्यक्ती आहे की, समाज परिवर्तन ही घडुन आणण्यांचे मोलाचे कार्य त्यांच्या मार्फत चालत असते.

असताच पद्धतीने डॉ. राधाकृष्णन हे एक महान विचारवंत तत्त्वज्ञान आणि एक महान शिक्षक म्हणुन प्रसिद्धी प्राप्त केलेली आहे. त्यांना सर्वश्रेष्ठ भारतरत्न हा पुरस्कार १९५४ साली देऊन बहाल केली आहे. अशी या पुस्तकेचे सारांश केलेला आहे.

Date - 12 जानेवारी 2025

Page No.:
Date :

समीक्षकाचे नाव : बी.एड. 2nd year 3rd sem.
: रत्नमाला युवराज ढेंगरे.

शीर्षक : सत्याचे पुजारी - गांधीजी

लेखक : शैलजा काळे.

प्रकाशन व स्थळ : ज्ञानेश प्रकाशन, द. नवनिर्माण,
प्रतापनगर, नागपूर - ४४००२२

लेखिका शैलजा काळे यांनी सत्याचे पुजारी हे पुस्तक १९९४ साली लिहिले. संपूर्ण जगातील जनतेने या पुस्तकास मोठ्या प्रमाणात प्रतिसाद दिला,

* थोडक्यात सारांश :→

हे पुस्तक दीर्घ आणि आनंदी जीवन जगण्याचे रहस्य उलगडण्याविषयी बोलत आहे. सत्य डोळ्यासमोर ठेवून आपण सत्याच्या मार्गाने जगायला पाहिजे. गांधीजींचा आदर्श म्हणजे सत्य आहे. त्यांनी म्हटले आहे " बुरा मत सुनो, बुरा मत देखो, बुरा मत सोचो" असे गांधीजींचे मत आहे. गांधीजी आदर्श हे डोळ्यासमोर ठेवून सर्व जनतेने काम (कार्य) करायचे आहे. त्याच प्रमाणे शाळेतील प्रसंग जे त्यांनी या पुस्तकात सांगितला आहे. सातवीत मस्तानी त्यांचे अक्षर खुप खराब होते. त्यांची खंत त्यांना जन्मभर वाटत राहली. त्यांनी कधी वळणदार अक्षर काढीतले की त्यांनी खुप वाईट वाटत असे, त्यांना वारंवार वाटत असे की मी प्रयत्न केला असता तर!

Date :

चांगले असर काढणे हे प्रयत्नांनी शक्य होत असते असे सुद्धा या पुस्तकात सांगितलेले आहे.

* स्वावलंबन :-> तसेच या पुस्तकात स्वावलंबन विषय लिहिलेले आहे. त्यांनी स्वावलंबनाला सुरुवात केली ती दक्षिण आफ्रिकेत तेव्हापासून ते स्वतःचे कपडे स्वतः धुणे, त्यांना इस्त्री करणे, स्वतःचे केस स्वतः कापणे याला सुरुवात केली. म्हणूनच जगातील लोकांना स्वावलंबी पणाने जगा दुसऱ्यांवर निर्भर राहुन काम कुणी करू नको स्वतःच स्वतःचे काम कुणी करा. हे सुद्धा या पुस्तकातुन शिकायला मिळाले.

~~तसेच~~

* सत्याग्रहाचा उद्देश :-> गांधीजींनी सत्याग्रह करून भारतातील जनतेला न्याय मिळवून दिला शेतकऱ्यांच्या हक्को साठी ते चंपारण्यात त्यांनी लढा दिला. त्याच प्रमाणे मिठाचा सत्याग्रह केला. कारण मीठ हे सामान्य जनतेच्या आहारातील पदार्थ आहे आणि त्यावर कर लावणे योग्य नाही हे त्यांना समजले होते. म्हणून त्यांना सत्याग्रहासाठी दांडी हे ठिकाणी निवडले. व ~~तो~~ त्यांनी दांडी यात्रा काढली आणि ६ एप्रिल १९३० हे सत्याग्रहाची तारिख ठरविण्यात आली. अश्या प्रकारे या पुस्तकात माहिती दिलेली आहे. व सर्व जनतेला हितकर असे कार्य सत्याचे पुजारी ~~मो~~ गांधीजी यांच्या या पुस्तकात लिहिलेले आहे.

# दमयंतीताई देशमुख बी.एड. कॉलेज, रामटेक.

## "वाचन संकल्प महाराष्ट्राचा"

## अभिनव उपक्रम

## सामुहीक वाचन पुस्तक परिक्षण व कथन




नाव - तन्नु कपुरचंद ढवले

वर्ग - बी.एड प्रथम वर्ष

सावित्रीबाई फुले ...(ज्ञानेश्वर भिवगडे)

# सावित्रीबाई फुले

* जन्म :-

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला जेव्हा भारतासारख्या रुढीवादी परंपरा असणाऱ्या देशात स्त्रीला 'चुल आणि मुल' एवढेच स्थान होते, ज्यादेशात स्त्रीला सती जावे लागत होते, महिलांना समाजात कोणतहि दर्जा दिल्या जात नव्हता, शिक्षणापासून स्त्रीला वंचित ठेवले होते. अशा वेळी महाराष्ट्रामधील सातारा जिल्ह्यातील 'नायगाव' या छोट्या खेड्यात 3 जानेवारी 1831 रोजी खंडोजी नेवसे यांच्या कुटुंबात एक सुंदर, रुपवान मुलगी जन्माला आली. तीच 'सावित्रीबाई.'. आईचे सुंदर रुप व वडिलांची मजबुत अंगकाठी सावित्रीला लाभली.

* बालपण :-

सावित्रीबाईचे वडिल खंडोजी नेवसे हे गावचे पाटिल होते. वडिलांच्या पुढाकारात गावातील न्यायनिवाडा चालायच्या आणि हे सर्व छोटि सावित्री बघायची. सावित्रीमध्ये वडिलतिल नेतृत्व करायचा गुण रुजला. पुढिल आयुष्यात नेतृत्व करायच्या याच गुणांमुळे सावित्री-बाईंनी स्त्री-शिक्षणाचे महान कार्य घडविले.

वडिलांसोबत कार्य करत राहायचा गुणही सावित्रीबाईंनी बालपनापासुनच स्वत:मध्ये रुजवला.

मुलींपेक्षा मुलांबरोबर धिटाईने खेळणे सावित्रीला अधिक आवडू लागले.

एखादे काम कठीण दिसले की ते लहान मुले टाळतात. लाडात वाढलेले तर छोटी कामेसुद्धा करत नाही. पण अगदी चार वर्षांच्या लहान वयातच सावित्रीबाईमध्ये कठीण कामे मन लावुन करायचे योग्य संस्कार सावित्रीबाईमध्ये आई-वडीलांकडून मिळत होते.

खंडोजींना सावित्रीबाईबद्दल विशेष अभिमान वाटायचा. ही मुलगी मोठेपणी कधितरी मोठे कार्य करेल असा विचार नेहमीच त्यांच्या डोक्यात यायचा. काहि काळानंतर हा विचार सावित्रीबाईंनी आपल्या आयुष्यात खरा करुन दाखविला.

विवाह :-

ज्या वयात 'विवाह' या शब्दाचा अर्थही मुला-मुलींना कळत नव्हते, त्या वयात त्यांचे लग्न त्याकाळात व्हायचे.

सावित्री नऊ वर्षांची असताना इ.स. १८४० मध्ये ज्योतिबा व सावित्रीबाईचा विवाह आनंदात संपन्न झाला. एक नविन इतिहास घडविण्याकरिता दोन दैदिप्यमान शक्ती एकत्र आल्या.

या दोन महाशक्तींनी पुढे स्त्री-शिक्षणाचे बिजारोपन केले.

## शिक्षणाची आवड व शिक्षिका प्रशिक्षण :-

वयाच्या नऊव्या वर्षात लग्न झाल्यानंतर ज्योतिबाबरोबर सावित्रीबाईंचा जीवनप्रवाह सुरु झाला.

वयाच्या पाचव्या वर्षापासून ज्योतिबांना शिक्षणाचे दर्शन झाले. पहिले एक वर्ष जोशी यांच्याकडे लिहणे - वाचणे झाल्यानंतर १८३३ पासुन पुढे तीन वर्षे 'चर्च ऑफ स्कॉटलँड मिशन' या मिशनरी शाळेत त्यांनी शिक्षण घेतले.

इ. स. १८४० नंतरच्या त्या कालावधीमध्ये हिंदूस्थानातील मुलींनी शिकायचे प्रमाण शुन्यावर होते. अशावेळी ज्योतिबांना स्त्री - शिक्षण प्रवाह सुरु व्हायला हवा असे वाटू लागले. आपली पत्नी सावित्री ही अशिक्षित आहे, प्रथम सावित्रीलाच आपण शिक्षित करावे व नंतर स्त्री - शिक्षणाच्या शाळा सुरु करायच्या असा मनोदय यांनी निश्चीत केला.

ज्योतिबांनी आपला विचार सावित्रीबाईंना सांगितले. व स्त्री - शिक्षणाचे महत्त्व यांनाही कळले. शिक्षण म्हणजे नव्या जगाची ओळख आहे. अक्षरे काढणे, वाचणे सावित्रीबाईंना आवडू लागले. या अगोदरपर्यंत फक्त बोलले जाणारे शब्द आता लिहिता वाचता येवू लागले. स्त्रीयांच्या प्रगतीचे साधन शिक्षण आहे हा बोध यांना होउ लागला. व पुढे शिक्षीका व्हायचे असा विचार यांनी पक्के केले. 'नॉर्मल स्कूल' नावाच्या पुण्यातील

शाळेत सावित्रीबाईंनी प्रवेश घेतला. इ.स. १८४५ ते इ.स. १८४६ या दोन वर्षात उत्तम गुणांनी परिक्षा उत्तीर्ण करुन इ.स. १८४६ मध्येच ट्रेंड शिक्षिकेचे प्रमाणपत्र मिळविले.

## मुलींची पहिली शाळा :-

इ.स. १८४८ च्या जानेवरि महिन्यात ज्योतिबांनी 'पुण्यामधील' बुधवारपेठेत 'भीडे' यांच्या वाड्यात मुलींची पहिली शाळा सुरु केली. स्त्रियांच्या जीवनातील हा सुवर्णवर्ष होता.

स्त्रीला शिक्षित करणे म्हणजे महापाप आहे. असे तेव्हा समजले जायचे. परंतु सावित्रीबाई क्रांतिज्योत हाती घेतली, याचा भयंकर विरोध झाला. सावित्रीबाईंना शाळेत जातांना शिव्या - शाप दिल्या जाऊ लागले. दगड मारल्या जाऊ लागले. परंतु सावित्रीबाईंनी याला पाठ न दाखवला आपले कार्य सुरुच ठेवले. आपन चालविलेले कार्य पुण्यकर्म आहे. असे सर्वांनी यांनी बजून सांगितले.

इतिहास हा सहजपने घडत नाही. त्यामागे भरावून जायची वृत्ती लागते आणि ती सावित्रीबाईंनी स्वत:त आणली. धर्ममार्तंडांच्या विरोधाला कणखरपणे यांनी उत्तर दिले. आणि आपले कार्य सुरुच ठेवले.

## सामाजीक कार्य :-

सावित्रीबाईंनी स्त्री - शिक्षणाच्या उभारलेला लढा म्हणजे नव्या पर्वाची उगवती पहाट होती ! सावित्रीबाईंनी चालवलेल्या कार्याची प्रशंसा त्या वेळच्या निरिक्षक अधिकाऱ्यांनी केली हे मोठे यश होते.

सावित्रीबाईंनी इ.स. १८४८ ते १८५२ या चार वर्षाच्या काळात एकुण १८ शाळा सुरु केल्या यासाठी यांनी ज्योतिबांची सोबत केली. १८ सप्टेंबर १८५१ ला 'रास्तापेठ' येथे ज्योतिबांनी मुलींची दुसरी शाळा सुरु केली. या शाळेला 'उत्तम शाळा' म्हणून प्रमाणपत्र मिळाले. पुढिल वर्षी तिसरी शाळा सुरु करायचे पाउल ज्योतिबांनी उचलले. यामागे सावित्रीबाईंचे पाठिंबा द्यायचे मोठे पाठबळ उभे होते. १५ मार्च १८५२ ला 'वेताळपेठ' येथे तीसरी शाळा सुरु झाली.

स्त्री - शिक्षणाचे कार्य यशस्वी झाल्यानंतर सावित्रीबाईंचा कल शुद्र - अतिशुद्र समाजातील स्त्रीयांवर होत असलेल्या अत्याचारांना वाचा फोडण्याकडे गेला.

सतीप्रथा, बालहत्या, केशवपन अशा गुरफटलेल्या प्रथा समाजात रुढ होत्या. या प्रथाविरुद्ध आंदोलन उभे करुन सावित्रीबाईंनी या प्रथा संपविल्या. सतीची चाल कायद्याने बंद केली, बालहत्या प्रकार बंद व्हावे म्हणुन 'बालहत्या प्रतिबंधक गृह' स्थापन केली.

Priya

'अत्याचार सहन करायचा नाही, कुप्रथा बंद करायच्या, सज्ञानी व्हायचे' असे अमृतकलश सज्ञानी बांधवांना देण्याकरिता यांची धडपड सुरूच असायची.

इ. स. १८७३ ला ज्योतिबांनी 'सत्यशोधक समाज' ची स्थापना केली. ज्योतिबांनी जे कार्य सुरु केले ते चालविण्याची जबाबदारी सावित्रीबाईंची असायची. इ. स. १८७३ मध्ये महाराष्ट्रात भयंकर दुष्काळ पडला. यावेळी सावित्रीबाईंनी जे कार्य दुष्काळपिडिता-करिता केले ते प्रशंसनीय आहे. पतीची सोबत घेऊन यांनी उपाशी असलेल्यांना जेवणाची सोय केली, भुकेल्यांना घास भरविले.

वयाच्या त्रेसष्ठाव्या वर्षी अविश्रांत परिश्रमामुळे ज्योतिबांचा देह थकला होता. इ. स. १८९० ला यांनी अखेरचा श्वास घेतला. ज्योतिबा अनंतात विलीन झाले.

ज्योतिबांच्या मृत्युनंतर सत्यशोधक समाजाचे नेतृत्व सावित्रीबाईंनी केले. इ. स. १८९३ मध्ये सत्यशोधक परिषदेचे सम्मेलनात सावित्रीबाईंनी अध्यक्षपद भुषविले.

जे महान कार्य सावित्रीबाईंनी केले त्यातून अत्याचार सहन करत असलेल्या दलित समाजाची सुटका झाली. त्यांच्या चेहऱ्यावर हसू येऊ लागले.

इतिहासाने सावित्रीबाईंचा गौरव 'दीन-दलितांची माऊली' असा केला. जेही कार्य त्यांनी घडवून आणले त्यात विधवा स्त्रीयांना मानाचे स्थान मिळवून द्यायचे श्रेष्ठ कार्य त्यांनी केले. 'विधवा' हा शब्दच त्यांनी संपविला.

* ज्ञानज्योत माऊली (मृत्यु) :-

सावित्रीबाईंनी समाजकार्याबरोबरच काही ग्रंथरचनाही केल्या. इ.स. १८५४ वर्षी 'काव्यफुले' हा कवितासंग्रह यांनी लिहिला. १८९२ मध्ये 'बावनकशी सुबोध रत्नाकर' हा ग्रंथ यांनी रचला.

इ.स. १८९७ मध्ये महाराष्ट्रात प्लेग या जीवघेण्या रोगाची भयंकर साथ आली. १८७६ च्या दुष्काळकाळात केलेल्या कार्याप्रमाणेच याहिवर्षीच्या पिडितांना सेवासुश्रुशा द्यायला त्या धावून गेल्या.

आपल्या मुलाच्या डॉ. यशवंत दवाखान्यात रुग्णांना पोहचविण्याचे सत्र त्यांनी सुरु केले. असे कार्य सुरु असतांना रोगाची लागन झालेल्या एका मुलाला त्यांनी स्वतःच्या खांद्यावर उचलून दवाखान्यात नेले. आणि हाच निमित्त यांच्या मृत्युला कारण ठरले. मुलाच्या रोगाची लागण यांना झाली. आणि १० मार्च १८९७ हा तो दुर्दैवी दिवस, हजारो-लाखोंचे श्रध्दास्थान असलेली माउली संपली.

संपूर्ण पुणे शहरात दुःखाची छाया पसरली. एका स्त्रीच्या मृत्युवर तिच्या अमुल्य कामगिरीमुळे लोक ढसढसा रडले. सावित्रीबाई आपल्या कार्याचा अमुल्य ठेवा मागे ठेवुन अनंतात विलिन झाल्या. आणि 'युगस्त्री' म्हणुन सावित्रीबाई इतिहासात अमर झाल्या.



**उच्च तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि. 20/12/2024 नुसार**

**रविकांत रागीट प्रशासकिय महाविद्यालयात**

**वाचनसंकल्प महाराष्ट्राचा पंधरवडा साजरा**

**दि.10/01/2025 ते 20/01/2025**

# अहवाल

उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन परिपत्रक दि. 20/01/2025 नुसार सर्व महाविद्यालय शाळेत **"वाचन संकल्प महाराष्ट्राचा "** हा पंधरवडा साजरा करण्याबाबत आदेश प्राप्त झालेले आहेत. त्यानुसार विश्वविद्यालयाच्या रामटेक येथे **वाचन संकल्प महाराष्ट्राचा** या उपक्रमांतर्गत दि. 10 जानेवारी 2025 ते 20 जानेवारी 2025 पर्यंत विविध स्पर्धा आयोजित करण्यात आल्या होत्या.

❖ **ग्रंथ दिंडी – दि. 10/01/2025**



ककासंवि. विश्वविद्यालयाच्या रामटेक येथे वाचन संकल्प महाराष्ट्राचा या उपक्रमांतर्गत ग्रंथ दिंडीचे आयोजन दि. 10/01/2025 रोजी आयोजित करण्यात आले होते. या ग्रंथ दिंडीचे उद्घाटन मा. राज्यमंत्री आशिषजी जयस्वाल व विश्वविद्यालयाचे मा. कुलगुरु प्रा. हरेराम त्रिपाठी यांच्या हस्ते करण्यात आले. या दिंडीत रविकांत रागीट प्रशासकीय महाविद्यालयातील जास्तीत जास्त विद्यार्थी आणि शिक्षक या ग्रंथदिंडीत सहभागी झाले.

## ❖ ग्रंथ प्रदर्शनी – दि. 16/01/2025



ग्रंथ प्रदर्शनीचे आयोजन दि.16/01/2025 रोजी करण्यात आले होते. या ग्रंथ प्रदर्शनीचे उद्घाटन प्रा. मिरासे यांच्या हस्ते करण्यात आले. या ग्रंथ प्रदर्शनीत विविध विषयाचे ग्रंथ तसेच प्राचीन ग्रंथ ठेवण्यात आलेले होते. यात 100 पेक्षा जास्त विद्यार्थ्यांनी या ग्रंथ प्रदर्शनीचा लाभ घेतला.

## ❖ 12 तास सामुहिक वाचन स्पर्धा – दि. 17/01/2025



वाचन संकल्प महाराष्ट्राचा या कार्यक्रमांतर्गत रविकांत रागीट प्रशा. महाविद्यालयाच्या वाचन कक्षात सतत 12 तास सामुहिक वाचन स्पर्धा घेण्यात आली. या कार्यक्रमात 50 पेक्षा जास्त विद्यार्थ्यांनी सहभाग घेतलेला होता.

## ❖ एका ग्रंथाचे परिक्षण व कथन – दि. 18/01/2025



महाविद्यालयातील एकुण 60 विद्यार्थ्यांनी एकुण 100 ग्रंथाचे परिक्षण केले असून या स्पर्धेत सहभागी झाले. तसेच त्यांच्या आवडीचे कुठलेही एक पुस्तक ग्रंथालयातुन घेवून विद्यार्थ्यांनी ग्रंथाचे परिक्षण व कथन केलेले आहे. सर्व विद्यार्थ्यांचे ग्रंथ परिक्षण करण्या–या विद्यार्थ्यांना प्रथम, द्वितीय, तृतीय असे 03 पारितोषिक दि. 26 जानेवारी 2025 रोजी देण्यात येणार आहे.

# रविकांत रागीट प्रशासकीय महाविद्यालय, रामटेक

## वाचन संकल्प महाराष्ट्राचा जानेवारी 2025

| अनु. क्र. | विद्यार्थ्यांचे नाव | विद्यार्थ्यांचे वर्ग कमांक कक्ष | ग्रंथाचे नाव व लेखकाचे नाव | प्रकाशन |
| --- | --- | --- | --- | --- |
| 1 | पार्थ हटवार | BACS प्रथम वर्ष | माजी जन्मठेप/वि.दा.सावरकर | लाखे प्रकाशन नागपुर |
| 2 | अमोल निळकंठ केळवदे | BACS द्वितीय वर्ष | सावत्रीबाई फुले /ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |
| 3 | सानिया किशोर राउत | BACS प्रथम वर्ष | छत्रपती शिवाजी महाराज /ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |
| 4 | अर्पणा क्रिष्णा कुंभरे | BACS प्रथम वर्ष | महात्मा गांधी संक्षिप्त चरित्र/ सौ.शारदा जोशी | विद्या भारती प्रकाशन पुणे |
| 5 | मोनाली खुशाल श्रीरामे | BACS प्रथम वर्ष | स्वामी विवेकानंद संक्षिप्त चरित्र व विचारधन/प्रा.सौ शारदा जोशी | विद्या भारती प्रकाशन पुणे |
| 6 | कशिश राजकुमार खंडाते | BACS प्रथम वर्ष | अहिल्याबाई होळकर /ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |
| 7 | साक्षी गंगाधर देवडगले | BACS प्रथम वर्ष | जिजामाता /ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |
| 8 | ज्योती धनराज डायरे | BACS प्रथम वर्ष | शामची आई/साने गुरुजी | विद्यार्थी गृह प्रकाशन पुणे |
| 9 | –शुभांगी गणेश राऊत | BACS प्रथम वर्ष | जिजामाता /ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |
| 10 | संगिता चमरु धरमगोडिया | BACS प्रथम वर्ष | राष्ट्रपिता महात्मा गांधी /सुजाता टिकेकर | मुक्त रंग प्रकाशन |
| 11 | मोहिनी उमेश उइके | BACS प्रथम वर्ष | अहिल्याबाई होळकर /ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |
| 12 | अविनाश काशिनाथ धुर्वे | BACS प्रथम वर्ष | डॉ. सरदार वल्लभभाई पटेल /ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |
| 13 | वैभव तुकाराम लाडे | BACS प्रथम वर्ष | लोकमान्य टिळक /ज्ञानेश्वर भिवगडे | लाखे प्रकाशन नागपुर |
| 14 | प्रेरणा विकास धमगाये | BACS तृतीय वर्ष | –शांतीदुत (भगवान गौतम बुद्ध)/सुजाता टिकेकर | मुक्त रंग प्रकाशन |
| 15 | वैष्णवी सुरेश राऊत | BACS तृतीय वर्ष | पसायदान/शैलाजा काळे | ज्ञानेश प्रकाशन |
| 16 | आयुष गोवर्धन वासनिक | BACS तृतीय वर्ष | क्रांती आणि प्रतिक्रांती /डॉ. बाबासाहेब आंबेडकर | भाषांतर प्रकाशन |

H.O.D.
Ravikant Ragit Prashaskiya
Mahavidyalaya
Mouda Road, Ramtek



# BOOK REVIEW
# ग्रंथ पुनरावलोकन

Date
दिनांक 20/01/2024

Name of Reviewer
समीक्षकाचे नाव Parth S. Hatwar BACS 1st yr

Title
शीर्षक माझी जन्मठेप

Author
लेखक वि. दा. सावरकर

Publication & Place
प्रकाशन व स्थळ लाखे प्रकाशन, नागपूर

A Brief Synopsis:
थोडक्यात सारांश :

Recommendation (would you recommend this book? Who to? Why?)
शिफारसी (तुम्ही या ग्रंथाची शिफारस कराल का? कोणाला? का?)

P.T.O.

माझी जन्मठेप हे स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांनी अंदमानात काळ्यापाण्याची शिक्षा भोगत असताना आलेल्या अनुभवांवर लिहिलेल्या आत्म चरित्रपर पुस्तक आहे

भारतीय स्वातंत्र्यलढ्यातील योद्धे वीर सावरकर यांना दोन जन्मठेपेची म्हणजे पन्नास वर्षांची शिक्षा झाल्यावर त्यांची रवानगी अंदमानला केली गेली. तेथले त्यांचे जिवन म्हणजे मृत्यूशी झुंज होती पण त्या झुंजीत मृत्यूचा पराभव झाला आणि सावरकरांचा विजय झाला. सावरकरांचा वीर रसाने ओथंबलेल्या चरित्रामध्ये अनेक रोमहर्षक पर्वे आहेत. त्यापैकी अंदमान पर्व हे अत्यंत रौद्र आणि भयानक पर्व आहे. त्याची रोमांचकारी कथा 'माझी जन्मठेप' या आत्मकथेत सावरकरांना सांगितली आहे. त्यांना २४ डिसेंबर १९१० रोजी काळ्या पाण्याची शिक्षा [२५ वर्षे] पहिल्यांदा सुनावण्यात आली, तर ३० जानेवारी १९११ रोजी दुसरी काळ्यापाण्याची शिक्षा [२५ वर्ष] देण्यात आली.

भारतातील बऱ्याच देशभक्तांना काळ्या पाण्याची शिक्षा झाल्याची नावे आपल्याला मिळतात. परंतु, ती शिक्षा कशा प्रकारे दिली जायची, किती भयाण प्रकारे दिली जायची याचे वर्णन असणारे पुस्तक म्हणजे 'माझी जन्मठेप'. असं म्हणतात की, ज्या विद्यार्थ्याला आत्महत्या करावीशी वाटत आहे, त्याने एकदा 'माझी जन्मठेप' हे पुस्तक जरूर वाचावे, ती व्यक्ती आयुष्यात परत कधीही 'आत्महत्या' हा विचारसुद्धा करणार नाही. असे काय या पुस्तकात? पाहूया....

नमस्कार,
आज मी 'माझी जन्मठेप' या पुस्तकाबाबत माझा अनुभव सांगत आहे.

कोठडीतला पहिला आठवडा वाचताना तर अक्षरश: अंगावर काटा येतो. जमादार सात क्रमांकाच्या चाळीत त्यांना बंद करण्यासाठी निघाला होता. वाटेत एक हौद लागला. 'यात स्नान करा' आदेश आला. पण, भिजवायचे काय? 'ही घ्या लंगोटी!' जमादारासमोर कपडे काढून लंगोटी नेसावी लागली. पण, स्नान कसले? जमादार म्हणाला, "मी 'लेव पाणी' म्हटले की च वाकायचे, एक कटोरा पाणी घ्यायचे. मी 'अंग मळा' म्हटले की च अंग घासायचे आणि 'और लेव पाणी' म्हटले की

Page No. Date / /20

फक्त दोन कटोरे पाणि!" बस, तीन कटोऱ्यात स्नान हे कोठे पाणी आहे?" अशी ही काय लंडन, पॅरिसमधली आंघोळ होती काय? 'मी अंदमानीश बाथची गंमत अनुभवली' असे सावरकर लिहितात, तेव्हा दुःख म्हणजे काय, याचा करुण अनुभव मनात दाटतो.

अरुंद कोठडी, दरवाजाच्या मागच्या भिंतीला सात-आठ फुटांवर एक झरोक्यासारखी खिडकी. सावरकरांनी अनेक रात्री कोठडीत बसून काढल्या. ज्या कोठडीत तात्याराव सावरकरांसारखे महान देशभक्त व्यक्तिमत्वाने शिक्षा भोगली, ते अंदमान आज राष्ट्रीय स्मारक झाल आहे. त्या कोठडीत एका कोपऱ्यात मडकं होतं, कारण नैसर्गिक विधीसाठी दिवसातून एकदाच शौचालयात सोडले जात असे, मडकं भरलं तर कैदी भिंतीवर हे नैसर्गिक विधी करीत. दिवसभर कोलू ओढून अंग पिळवटून येई, पोटाचे आतडे ताठले जात, भोवळ येई, रात्री कोठडीत अंग टाकले की गाढ झोप लागे. सावरकर म्हणतात, "झोपेचे तेवढेच सुख मला ~~अंदभ~~ अंदमानात मिळाले!" म्हणजे अंदमानात त्यांना गाढ झोप लागत असे

गुन्हा काय? मातृभूमीवर प्रेम केले आणि मातृभूमीच्या श्रृंखला तोडण्यासाठी, तिला बंधमुक्त करण्यासाठी प्रयत्न केले. ब्रिटिशांच्या

जोखडातून तिला सोडविण्यासाठी प्राणांची बाजी लावणाऱ्या स्वातंत्र्यवीरांना खूप यमयातना भोगाव्या लागल्या. अंगातील संपत चाललेली सहन शक्ती, पावसात काम करून ओलेचिंब झालेले कपडे, थंडीने सारखे कुडकुडणारे अंग अशा स्थितीत एका हातात भिजून चिंब झालेल्या पोळ्या, पावसाने भरलेली आंबटीची भांडी. हे हाल सोसताना प्रतिकार केला तर अधिक हाल, छळ, मार, जेवण मिळत नसे, तसेच उभे राहिल्यास मग ऑर्डर येई, "उठो, जाना हो गया, चलो!" मरा उपाशी, त्यांना काय पडलीय?

आत्महत्या तर तुरुंगात सततच्या. इंदुभूषण रॉय यास 'माणिकतोळा कटा'त तरुण वयात दहा वर्षांची शिक्षा झाली होती. पण, इथल्या त्रासास, छळास कंटाळून त्याने काम करण्यास साफ नकार दिला. सावरकरांनी त्यास धीर देण्याचा खूप प्रामाणिक प्रयत्न केला, काल जो आपल्याशी बोलता बोलता कोठडीत बंद झाला होता, तो इंदुभूषण सकाळी पाहतात तो स्वतः फाशी झालेला, मान मोडलेली, जीभ निघालेली, वाचताना ऊर फाटून जातो.

ज्या तेलाच्या घाण्याला बैलाकडूनसुद्धा इतके तेल काढून घेतले जात नव्हते, तिथे अंदमानातील कैदी कोलू फिरवून ३० पौंड तेल

काढत. त्यात काहीही सवलती नव्हती. ही भयानक शिक्षा भोगताना शरीराला असह्य अशा वेदना होत. या शिक्षेपेक्षा जीवनच नको, असे कधीकधी कैद्यास वाटे. "तापाचे औषध आहे का? रेचाचे औषध आहे का?" म्हणून एका बंदीवानाने दुसऱ्या बंदीवानास दबलेल्या आणि त्रासिक स्वरात विचारले, म्हणजे त्या वाक्याचा अर्थ ताप घालविणारे औषध असा होत नव्हता. अंदमानी जगतात रोगाचे औषध म्हणजे रोग उत्पन्न करणारे औषध असा अर्थ होई. पांढऱ्या कण्हेरीच्या मुळ्या उगाळून घेतल्याने मनुष्य भयंकर तापाने फणफणतो, गुंजेच्या बिया उगाळून घेतल्याने मनुष्य मधील रक्ताचे रेच सुरू होतात, घावात सुईने शिवून, भिजवलेला दोरा ओवून ठेवला की घाव सडून सहा महिने जितपत पडता येते, ही माहिती प्रत्येकाच्या तोंडी असे.

ती खरी की खोटी, असे विचारता बहुतेक लोक ती स्वानुभवाने अनुभवली आहे म्हणून सांगत. आत कोलूच्या आणि बाहेर लाकूडतोड, जंगलकाट, विणकाम इत्यादी कामांच्या भयाने या बाधक मुळ्या आणि औषधे खाऊन, आपल्या पायावर आपणच घाव करून, त्यात तो घाव सडविणारे दोरे घालून, सुईने आपल्या गळ्यास टोचून त्या रक्ताच्या गुळण्याने रक्ताचा उलट्या वा थुंकीत छातीतले रक्त येत आहे, असे

निर्मूलन असे महान समाजकार्य देखील केले. इतिहासातील विविध उदाहरणे सांगून स्वतःबरोबर इतर सर्व कैद्यांचे मनोधैर्य वाढवत असत. खिडकीला असलेली जाळी म्हणजे कारागृहातील टेलिफोन असे वापरून खाली असलेल्या व्यक्तीशी संवाद साधणे, पायातील बेड्या वाजवून बोलणे, असे प्रयोग केल्याचे सावरकर लिहितात

अंदमानातील शेवटचे दिवस आले असता कनिष्ठ बंधू भेटावयास आले. ज्येष्ठ बंधूंची प्रकृती अगदी खालावत आली होती. अशा वेळी सुटकेची आशा मनात क्षीण असताना असे वाटे की, ही भेट बहुधा शेवटचीच असणार. त्यांनी कनिष्ठ बंधूस "तू शेवटची बातमी ऐकण्यास सिद्ध राहा" हा निरोप दिला. पण, पाहा नियतीचा जाहिरनामा. सावरकर लिहितात "१९११ च्या वर्षी बंद झालेले ते त्या कारागृहाचे दार १९२१ या वर्षी परत एकदा करकरले. त्या जबड्याचे ते तोंड परत एकदा उघडले आणि आम्ही दोघेही बंधू जिवंतपणी आतून बाहेर पडलो." अंदमानमधून मुंबईला पाठविण्याकरिता ते 'महाराजा' नौकेवर चढले तो दिवस २ मे, १९२१.

• सावरकर अंदमानातून निघताना निरोप देण्यासाठी अनेक लोक दबा धरून बसले होते.

Page No. Date / /20

शिपायांच्या पहाऱ्यात समुद्राकडे दोघे बंधू चालले होते इतक्यात एक बंदी एकाएकी पुढे झाला. शिपायांना न जुमानता चाफ्याच्या फुलांची फुलमाळ त्या सर्व बंदीवानांच्या वतीने सावरकरांच्या गळ्यात घातली. शिपाई आरडाओरडा करतायत तोवर सावरकरांच्या पायावर डोके ठेवून निघूनही गेला. हा प्रसंग खरंच अंगावर शहारे आणतो.

यानंतर रत्नागिरी येथील बंदीशाळेमध्ये सावरकरांना ठेवण्यात आले. सुरूवातीला रत्नागिरी येथील काळ खूप अवघड गेला, असं सावरकर सांगतात. शेवटी जी काही सूट अंदमानात मिळाली होती, जेवण थोडं बरं जे मिळत होतं, ते सर्व रत्नागिरीत बंद झाले. वर एकही मनुष्य जवळ नाही, कागद-पेन्सिल नाही, पुस्तके नाहीत. शिक्षा पुन्हा पहिल्यापासून भोगावी लागावी, तसे स्थित्यंतर झाले. पुन्हा निश्चय केला कवितांचे सूत्र मनात आठवले, रत्नागिरीपर्यंतच्या प्रवासात त्यांच्या कारावासाची कठोर कथा संकलित करून त्याचे भागदेखील मनात करून झाले. कारागृहातील आजूबाजूच्या लाल विटांच्या तुकड्याने मुख्य मुद्दे लिहून ठेवण्याचं काम दोन-तीन महिन्यांत झालं आणि त्याच टिपणांमधून मग विस्तृत ग्रंथ सिद्ध केला. तो ग्रंथ म्हणजेच 'माझी जन्मठेप' हा होय.

रत्नागिरीनंतर काही दिवसांनी येरवडयाच्या जेलमध्ये सावरकरांना हलवण्यात आले. या दोन्हीही कारागृहात समाजकारण, शुद्धी, राजबंदींना विविध प्रकारचे विषय शिकवणे, विविध क्रांतिकारकांची चरित्र सांगणे, स्वतःचे विविध विषयांवर चिंतन, लिखाण असे उपक्रम सुरु होते. अंदमानपासून नेहमी कोणी न कोणी येऊन सांगे की, "बडे बाबू आपको छुडाने वाले है।" किंवा "सावरकर, आता तुम्हाला सोडतील." परंतु, दर वेळी वाटे की, गेल्या बोलण्याप्रमाणे हे असेच वायफळ असेल. परंतु, या वेळी ६ जानेवारी, १९२४ ला पर्यवेक्षक निरोप घेऊन आला, "सावरकर, तुम्ही सुटलात!" तेच सर्व जण आनंदून अभिनंदन करु लागले. काही अटींवरुन तेथून सुटका झाली आणि जन्मठेपच्या सीमेस उल्लंघन करुन जीवनाच्या सीमेत सावरकर परत आले.

लॉकडाऊन मुळे बऱ्याच जणांच्या मानसिक आणि शारीरिक स्वास्थ्यावर प्रतिकूल परिणाम झाला आहे. पण, यापेक्षाही भयावह परिस्थिती मध्ये अंदमानमध्ये आपल्या क्रांतिकारकांनी अनेक वर्षे काढली आहेत, परिस्थिती किती भीषण होती आणि त्यांवर बंदीवान काय

Page No. Date / /20

उपाय करत, त्यांची मानसिकता काय असेल हे अरंच सद्यपरिस्थितीत सर्वांनीच वाचायला हवं. आताची परिस्थिती भीषण असली तरी अंदमान इतकी नक्कीच भयंकर नाही, हे लक्षात येते.

आपल्या मातृभूमीला स्वातंत्र्य मिळवण्याचे ध्येय आपल्या देशाविषयीचे उपजत कर्तव्य हे वैयक्तिक स्वार्थापेक्षा कैकपटीने श्रेष्ठ असते, हे या पुस्तकात दिसून येते. आपले ध्येय उदात्त असले की, कितीही उडचणी येऊ देत, त्यावरदेखील आपण विजय मिळवू शकतो. हे सर्व लिहित असताना वारंवार सावरकरांचे शब्द आठवतात .......

काल स्वयं मुझसे डरा हैं,
मैं काल से नहीं।
काले पानी का काला घोट पीकर,
काल से कराल स्तंभो को झकझोर कर,
मैं बार-बार लोट आया हूँ,
और फिर भी मैं जीवित हूँ।
हारी मृत्यु हैं, मैं नहीं..।

—x—x—x—

पार्थ हटवार
[BACS 1st year]

Page No. Date / /20

Name- Parth .S. Hatwar

Class- BAcs I^st Year

College- Ravikant Ragit Prashaskiya mahavidhalay. Ramtek

Essay- Topic - 'mahakavi kalidas'

Page No. Date / /20

# महाकवी कालिदास

कालिदास हे संस्कृत भाषेतील महान कवी आणि नाटककार होते. कालिदासांनी भारतातील पौराणिक कथा आणि तत्वज्ञानावर आधारित रचना तयार केल्या. कालिदास यांचे ऋतूंचे त्यांचे वर्णन अनोखे होते आणि त्यांचे साधर्म्य अतुलनीय होते. संगीत हा त्यांच्या साहित्याचा प्रमुख भाग आहे आणि रस निर्माण करण्यात त्यांची तुलना नाही. साहित्य सौंदर्य बरोबरच त्यांनी आपल्या शृंगार रस प्रधान साहित्यात आदर्शवादी परंपरा आणि नैतिक मूल्यांचीही योग्य ती काळजी घेतली आहे. त्यांचे त्यांचे नाव अमर आहे आणि त्यांचे स्थान वाल्मिकी आहे आणि व्यासांच्या परंपरेत. कालिदास हे शिवभक्त होते. कालिदास नावाचा शाब्दिक अर्थ 'कालीचा सेवक' असा आहे. कालिदास हे दिसायला अतिशय देखणे होते आणि विक्रमादित्यच्या दरबारातील नवरत्नांपैकी एक होते. पण असे म्हणतात की कालिदास हे त्यांच्या सुरुवातीच्या आयुष्यात अशिक्षित आणि मूर्ख होते. कालिदासांचा विवाह विद्योत्मा नावाच्या राजकन्येशी झाला होता.

# कालिदासांचा इतिहास

कालिदास इस पूर्व 150 ते 450 पर्यंत जगले असावेत असे मानले जाते. व त्या वर विविध मते आढळतात. त्यांचा कालखंड हा गुप्तकाळ असावा असे नवीन संशोधना वरून ज्ञात झाले आहे. रामायण आणि महाभारत यांसारख्या महाकाव्यां च्या निर्मितीनंतर संस्कृत साहित्याच्या आकाशात अनेक कवी-नक्षत्रांनी आपला प्रभाव प्रकट केला, परंतु नक्षत्र-तारा-ग्रहसंकुल असूनही भारतीय साहित्याची परंपरा ज्या अर्थाने ज्योतिषशास्त्रीय म्हणता येईल. मधुरता आणि प्रसाद यांची परम परिपक्वता, भावनेचे गांभीर्य आणि रसनिर्झरिणीचा सुरळीत प्रवाह, श्लोकांची मुळमुळीत-ता आणि वैदिक काव्यपरंपरेची महानता, तसेच आर्ष कवितेची दृष्टी आणि अभिमान या सर्वांचा सुरेख मिलाप आपल्याला कालिदास यांच्या कवितेत दिसतो.

कालिदास हे वैश्विक कवी आहेत. देशाच्या सीमा ओलांडून त्यांच्या कवितेचे स्वर सार्वत्रिक गुंजत आहेत. यासोबतच या देशाच्या भूमीबद्दल संपूर्ण सहानुभूतीपूर्वक प्रेम व्यक्त करणाऱ्या कवींमध्येही ते अद्वितीय आहेत. कालिदासांच्या काळापर्यंत भारतीय विचार परिपक्व आणि विकसित झाला होता, षड्दर्शन आणि वैदिक तत्वज्ञानाचे सिद्धांत

आणि सिद्धांत बदललेल्या स्वरूपात समोर आले होते. दुसरीकडे, लोकांमध्ये कथा आणि पौराणिक कथांचा प्रच प्रचार होता. वैदिक धर्म आणि तत्वज्ञानही .पी.च्या पुनस्थापनेचा अभूतपूर्व उपक्रमही त्यांच्या काळात किंवा त्यापूर्वीच झाला होता. कालिदासाच्या काळापर्यंत ज्योतिष, गणित, आयुर्वेद इत्यादींचाही चांगला विकास झाला होता.

## जगातील सर्वोत्तम लेखक

कविकुलगुरू महाकवी कालिदास यांची गणना केवळ भारतातीलच नव्हे तर जगातील सर्वोत्कृष्ट लेखकांमध्ये केली जाते. नाटक, महाकाव्य आणि गीत काव्य या क्षेत्रात आपल्या अद्भुत सर्जनशीलतेचे दर्शन घडवून त्यांनी स्वत:ची वेगळी ओळख निर्माण केली. ज्या कामामुळे कालिदासला सर्वाधिक प्रसिद्धी मिळाली ते म्हणजे त्यांचे 'अभिज्ञान शाकुंतलम' हे नाटक जगातील अनेक भाषांमध्ये अनुवादित झाले आहे. 'विक्रमोर्वशीय' आणि 'मालविकाग्नि-मित्र' ही त्यांची इतर नाटकेही उत्कृष्ट नाट्यसाहित्याची उदाहरणे आहेत.

कालिदास हे संस्कृत साहित्याचा आणि भारतीय प्रतिभेचा तेजस्वी तारा आहेत. कालिदासांच्या

